







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका



# नवी क्षितिजे

वर्ष-८
अंक-32



अनुक्रमणिका



वर्ष आठवे

३२



संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील

रचना
पामार्ट
मुंबई २८

पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
पुष्प कुंज, पालखी वाडी
१३, काशीनाथ धुरु रोड मुंबई २८

मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९ वि. प. रोड मुंबई ४

वार्षिक वर्गणी
रु. १२-५०

या अंकाची
किंमत रु. ४

मालक : सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४

मुद्रण स्थळ :
बिमा मुद्रक आणि प्रकाशक लि.,
सातारा, मांचा बिमा छापखाना
४१५ ००२

# अनुक्रमणिका







# संपादकीय :

हा बत्तिसावा अंक. या अंकात अस्तित्ववाद आणि मानवी आक्रमक प्रवृत्ती असे दोन लेख आले आहेत. आक्रमक प्रवृत्तीच्या लेखांकाबरोबर ही लेखमाला पूर्ण होत आहे. आणखी एकदोन लेखांकानंतर अस्तित्ववाददेखिल पूर्ण होईल.

पुढील योजना म्हणून नवे दोन विषय आम्ही निवडले आहेत. एक अस्तित्ववादाच्या भाष्यकारांचा व दुसरा मानसशास्त्रातल्या विचारवंतांचा.

पहिल्या लेखमालेतून काही निवडक अस्तित्ववादी विचारवंतांचा परिचय देण्याचा प्रयत्न होईल. यात त्या त्या विचारवंताचे चरित्र असेल. चरित्राच्या अनुषंगाने त्याची बौद्धिक जडणघडण दिली जाईल. व शेवटी त्याच्या विचारांची सर्वसाधारण दिशा सांगितली जाईल.

दुसरीत फ्रॉईड, युंग, अॅडलर, एरिक फ्रॉम, मेलानी क्लेन, कार्ल रॉजर्स अशा काही निवडक मानसशास्त्रज्ञांचा परिचय देण्यात येईल. हा परिचय मुख्यत्वे मानवी व्यक्तिमत्वाबद्दल त्यांच्या ज्या धारणा आहेत त्या धारणांच्याच संदर्भात असेल. थोडक्यात या लेखमालेत फ्रॉईड वगैरेंच्या मानवी व्यक्तिमत्वा-संबंधीच्या उपपत्ती देण्यात येतील.

पाहू या आमचा बेत कितपत तडीस जातो ते !

— संपादक
२४।१०।१९७९

अनुक्रमणिका

## तत्त्वज्ञान

### अस्तित्ववाद : (२१)

● विश्वास पाटील

परंतु खरी वस्तुस्थिती अगदी अशीच आहे काय ? बाह्य वास्तव हा मानसशास्त्रीय परिक्षेत वापरतात तसा पांढऱ्या कागदावरचा रंगाचा ठिपका आहे काय की त्या ठिपक्यात मी घोडा पाहावा, दुसऱ्या कोणी राक्षसी पाहावी तर तिसऱ्याने आणखी काही तिसरेच पाहावे ? खरी गोष्ट अशी आहे की वास्तवाला सुद्धा स्वतःचा आकार आहे, स्वतःची निश्चित जागा आहे. आमच्या विवक्षित जागेवरून व कोनातून हा आकार आम्ही पाहातो. हा कोन बदलतो तेव्हा काही प्रमाणात वास्तवाचा आकारही बदलत असतो. पण मूळ वास्तव पार नाहिसे मात्र होत नाही. माझ्या घरासमोर शंकराचे देऊळ आहे. माझ्या खिडकीतून कोणालाही ते देऊळ दिसते. माझ्याप्रमाणे माझ्या मुसलमान मित्रालाही ते दिसेल. दोघांच्या दिसण्यात फरक इतकाच की माझ्या पाहाण्यात त्या देवळाबद्दल आपलेपणा असेल. माझ्या मुसलमान मित्राच्या नजरेत तो आपलेपणा असणार नाही. तसेच ते देऊळ पाहाताना दोघांच्या कोनातही थोडाफार फरक असेल.

जगाचे आपले पाहाणे क्लायडोस्कोपमधून पाहाणे नसते. ते टेलिस्कोपमधून पाहाणे असते. क्लायडोस्कोपमधून क्लायडोस्कोपमध्ये जेवढे आकार असतात तेवढेच फक्त दिसू शकतात. टेलिस्कोपमधून आपण टेलिस्कोपच्या बाहेर असणारे आकार पाहातो. जग पाहाण्याचा आमचा कोन जरी कितीही वैयक्तिक असला तरी आम्ही पाहातो ते जग सार्वजनिक आहे.

अर्थ आणि मूल्ये सार्वजनिक आणि वस्तुनिष्ट आहेत व खाजगी आणि सापेक्षही आहेत. सार्वजनिक अर्थ जेव्हा आपण प्रत्यक्ष जगण्याचा प्रयत्न करतो तेव्हा तो अर्थ अनन्य बनतो. आमच्या आयुष्याचा कस हे अनन्य अर्थ कितपत अनन्य आहेत यावर ठरतो. जगातली बहुसंख्य मनुष्ये कन्फॉर्मिस्ट म्हणजे प्रवाहपतित असतात. सामाजिक दृष्टया आज्ञाधारक असतात •स्वतःची खास ओळख जगण्याऐवजी तो समाजाने त्यांच्याकडून अपेक्षा केलेली ओळख जगतात. कोणी समाजाऐवजी कोणा महात्म्याच्या, हुकूमशहाच्या सल्ल्याचे आयुष्य जगतात.

प्रत्येक आयुष्य हे स्वतःच स्वतःसाठी एक कोडे असते. मी कोण ? माझ्या आयुष्याचा अर्थ व प्रयोजन काय ? मी कशासाठी जगत आहे ? कशासाठी जगावे ? हे ते कोडे होय. कोणी हे प्रश्न गंभिरपणे घेतात. कोणी दुर्लक्षित

करतात. या प्रश्नाचे उत्तर ज्याने त्याने स्वतः शोधून काढायचे आहे. हे उत्तर इतर कोणी इच्छा असूनही आपणाला देऊ शकत नाही तसेच ते कोणी कोणावर लादूही शकत नाही. शक्यता आहे की मला सुचलेले उत्तर पूर्वीही कुणा दुसऱ्याला सुचले आहे. परंतु शेवटी प्रत्येकाची स्थिती अनन्य असल्याने हे उत्तर जेव्हा स्वीकारले जाते तेव्हा ते अनन्य बनते. ज्याचे त्याचे स्वतःचे बनते. कारण प्रत्येकजण फक्त स्वतःचेच आयुष्य जगत असतो, जगणार असतो.

उत्तर शोधण्याच्या क्रियेचे गेस्टाल्ट पूर्ण करण्याच्या प्रक्रियेशी साम्य आहे. उत्तर म्हणजे समोरच्या चौकटीतला गाळला गेलेला दुवा. सात अधिक सात बरोबर × × × या समीकरणात फक्त एक दुवा कमी आहे. हा दुवा मिळाला की सात अधिक सात हे समीकरण पूर्ण होईल. येथे कोठलाही आकडा लिहून काम भागणार नाही. तर जो आकडा बरोबर बसेल असाच आकडा लिहिला गेला पाहिजे. चौदा हा आकडा जर आपण समीकरणात भरला तरच ते समीकरण पूर्ण होणार आहे म्हणजे चौदा हे या समीकरणाचे उत्तर आहे. चौदा बदलून पंधरा, सोळा, वीस यापैकी कोणताही आकडा जरी घेतला तरी समीकरणाचा गेस्टाल्ट बंद होत नाही. चौदा या उत्तराने आपल्या समीकरणाला बरोबर न्याय दिला. इतर उत्तरे येथे अयोग्य ठरतात. जी गोष्ट सात अधिक सातच्या समीकरणाची तीच आयुष्याचीही. येथेही त्या आयुष्याशी बरोबर जमणारे उत्तर घेतले तरच त्या आयुष्याचा गेस्टाल्ट शेवटी योग्य प्रकारे बंद होईल.

याच उत्तराला मार्ग आयुष्याची प्राथमिक निवड म्हणतात. ही निवड बरोबर की पुढच्या सगळ्या निवडी बरोबर एकदम जागच्या जागी बसतात. ही निवड चुकली की पुढच्या निवडी चुकून सगळे आयुष्यच चुकते. हे उत्तर म्हणजेच त्या त्या आयुष्याचा खरा 'मी'. मात्र उत्तर मिळताच 'मी' पूर्ण होत नाही. उत्तर म्हणजे 'मी'च्या शोधातले पहिले योग्य पाऊल. मी फक्त आयुष्याच्या शेवटच्या क्षणीच काय तो पूर्ण होतो. कारण तेव्हाच त्या आयुष्याचा मोकळा असलेला गेस्टाल्ट पूर्णपणे बंद होतो. 'मी कोण' या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी स्वतःशी एकनिष्ट असावे लागते. जेव्हा हे उत्तर मिळते तेव्हा ते जणू एका उपजत उत्स्फूर्ततेने मिळते. व म्हणूनच हे उत्तर मानसिक निश्चिन्तता निर्माण करते.

आपल्याच्या या प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे तार्किक विचारातून मिळत नाहीत. ती अंतःस्फूर्तीतून किंवा कल्पनाशक्तीतून मिळतात. बरेच दिवस एखाद्या प्रश्नाने आपल्या मेंदूला पोखरावा, अनेक प्रकारे तो प्रश्न सोडविण्याचा आपण प्रयत्न करावा व तो प्रश्न काही सुटू नये व मग अकस्मात ध्यानी मनी नसताना अचानकपणे त्या प्रश्नाचे उत्तर सापडावे तसा काहीसा हा प्रकार आहे.





तार्किक विचारातून हे प्रश्न सुटते तर वैचारिक समीकरणे मांडून हे प्रश्न सोडविता आले असते. पण तसे घडत नाही. येथे नवनिर्माणाशी संबंध असतो. कारण अशी उत्तरे अनेकदा आमूलाग्र नवीही असू शकतात. रूढ मार्गांशी त्यांचा एवढासादेखिल संबंध नसतो. हिंसा हाच परमधर्म मानणाऱ्या समाजात अहिंसेला परमधर्म मानणारा कोणी जन्मणे म्हणजे जीवनाची आमूलाग्र नवी घाटणी शोधून काढणें होय. स्वतःसाठी जणू त्याने एक अनन्य अर्थच शोधला होता. आपल्या स्वेच्छित निवडीतून सर्व समाजासाठी एक नवे मूल्यच तेथ जन्माला घातले गेले होते.

आयुष्याच्या मूलभूत प्रश्नांवरचे उत्तर कशाप्रकारे गवसते हे एका उदाहरणाने पाहता येण्यासारखे आहे. म्हणजे आयुष्याच्या गेस्टाल्टची मागणी कशी पुढे येते व ही मागणी पुरी होते म्हणजे काय होते हे आपल्या बरोबर ध्यानात येईल. आयुष्य गौतम बुद्धाचे आहे. गौतमाचा जन्म राजघराण्यातला. गौतमाच्या जन्माच्या वेळी ज्योतिषी त्याच्या वडिलाना सांगतात की हा मुलगा पुढे मोठा संन्यासी होऊन नांव कमाविल. ते घडू नये म्हणून राजा शुद्धोदन गौतमाला सांसारिक दुःखाचा लवलेशही जाणवणार नाही अशा प्रकारे बंदोबस्तान ठेवू पाहतो. तरीही एके दिवशी जराजर्जर वृद्ध मनुष्य, व्याधिग्रस्त मनुष्य आणि मृत मनुष्य अशी मानवी अपरिहार्य स्थितीची आठवण करून देणारी तीन दृश्ये त्याला दिसतातच. आणि असले काही तोवर त्याने पाहिलेले नसल्याने त्याच्या मनावरती दारुण परिणामही करतात.

बुद्धाच्या दृष्टीने ही तीन दृश्यें म्हणजे जणू एक एस्थेटिक व्हिजनच होते. ही दृश्ये पाहताच त्याची चिकित्सक विचार शक्ती काही काळ जणू तहकूब होऊन राहिली. आणि भावनेने तो त्या दृश्याच्या अर्थाचा विचार करू लागला. (भावना हा शब्द बऱ्याच व्यापक अर्थाने आपण वापरीत आहोत. भावना म्हणजे केवळ सुख वा दुःखकारक संवेदना नव्हेत. आतून आपणाला जे जे वाटते ते ते सर्व भावना या शब्दात आपणास अभिप्रेत आहे.)

गौतम केवळ सिग्नलशी चालत नव्हता. जर तो केवळ सिग्नलवर जगत असता तर वरील तीन दृश्ये पाहताच तो असे म्हणाला असता की जन्माला आलेला जीव म्हातारा होणे, आजारी पडणे व मरणे ही तर जगाची रीतच आहे. परंतु गौतमाच्या बापाने जगाच्या या रीती संबंधी त्याला पूर्ण अज्ञानात ठेवल्याने हा अनुभव त्याला तीव्र धक्का देऊन जातो. व ती तीन दृश्ये त्याच्या [illegible] मानवी जीवनाविषयी एक मूलभूत असा मूड निर्माण करतात.

फेनोमेनॉलॉजीचा विचार करताना आपण हे पाहिलेच की जेव्हा कसली जाणीव तयार होते तेव्हा प्रथम जाणीव आणि जाणीवेचा तो घटक हा एकरूप असतात. मागाहून मनाने त्या घटकापासून अलग होऊन त्या घटकाला आपण

सांकेतिक खुणा देतो. नाव देतो. गौतम जेव्हा ती तीन दृश्ये पाहातो तेव्हा त्याची जाणीव जणू ती तीन दृश्ये बनतो. या प्रकारची व्हिजन अनेकदा फार परिणामकारक ठरतात. कारण त्यांचे खरेपण संशयातीत असते. गौतम त्या तीन दृश्यांचा विषय डोक्यातून काढून टाकू शकला नाही.

त्या तीन दृश्यांनी गौतमाच्या मनाचा जणू पूर्ण कबजा घेतला; मानवी अपरिहार्य नियतीचे सत्यदर्शन त्याला घडविले. गौतमाला त्या क्षणी जो अनुभव आला त्या अनुभवाची तुलना अर्जुनाला कुरुक्षेत्रावर झालेल्या विश्वरूपदर्शनाशीच केवळ होऊ शकेल. असल्या अनुभवातून गेल्यानंतर त्या व्यक्तीच्या आयुष्यात आमूलाग्र परिवर्तन न होते तरच नवल ! हे अनुभव व्यक्तीच्या गाभ्यालाच जणू हात घालतात. आणि जे एक मानसिकदृष्ट्या निर्धास्त, सुरक्षित जीवन त्या व्यक्ती जगत असतात तेच डळमळीत करून टाकतात. अशा प्रकारच्या अनुभवातून गेलेले काहीजण तर ठार वेड झाल्याची नोंद इतिहासात आहे. अनेकजण आध्यात्मिक अर्थाने आत्मपरिवर्तनासाठी धडपडू लागतात. कधी कधी हे अनुभव त्या व्यक्तीचे सगळे आयुष्यही उध्वस्त करून टाकतात, येथून पुढे संपूर्ण जीवन त्या व्यक्तीला वायफळ, अर्थशून्य वाटू लागते. थोडक्यात तेथवर जर तो मनुष्य सिग्नल आणि सिग्नलबरहुकूम हालचाल या प्रकारचे निश्चित आयुष्य काढीत असला तर यानंतर त्याचा सिग्नलवरचा विश्वास जणू काही पार उडून जातो. आयुष्य हा त्याच्यासाठी पुन्हा एकदा चमत्कार, प्रश्नाचिन्हांकित, संदिग्ध प्रतीक बनते. आयुष्य म्हणजे ओळखीच्या लेबलांची एक व्यवस्था ही पहिली स्थिती आता शिल्लक उरत नाही.

वर म्हटला तो अनुभव आल्यानंतर गौतम शाश्वत सत्याच्या शोधासाठी घराबाहेर पडला. चालू जीवन गौतमाला दुःसह, अपूर्ण, असमाधानकारक वाटू लागले आणि नव्या अधिक अर्थपूर्ण आयुष्याच्या शोधासाठी तो घराबाहेर पडला. हेच त्याच्यातले आणि अस्तित्ववादी नायकातले साम्य. गौतमाच्या आयुष्याने त्याला प्रश्न केला. या प्रश्नावर गौतम पारंपरिक व सांकेतिक उत्तरे मिळवू शकला असता. पण ती उत्तरे त्याला पटत नव्हती. म्हणून स्वतःच जो त्या उत्तराच्या शोधात निघाला. जीवनाचे एक नवे आकलन त्याला झाले होते; त्या आकलनाशी साजेसा जीवनमार्ग त्याला आता हवा होता.

गौतमाने ती तीन दृश्ये पाहिली. या दृश्यांनी त्याच्या मनाचा इतका पाठपुरावा केला की त्या मृत्यूचा अर्थ लावण्यासाठी घरदार, बायकामुले सोडून त्याने तडक अरण्याची वाट धरली. मानवी आयुष्याच्या खऱ्या अर्थाच्या प्रश्नाने त्याला जणू पछाडून टाकले. हा प्रश्न सोडविण्यासाठी प्रथम त्याने शरीर कष्टवून पाहिले. गौतमाने इतके उपासतापास केले की शेवटी तो मरणाच्या दारी जाऊन पडला. पण त्याला त्याच्या प्रश्नांचे समाधानकारक उत्तर मिळाले नाही.



अनुक्रमणिका

पुढे त्याने ग्रंथांचा अभ्यास करून पाहिला, तरिही त्याला उत्तर मिळाले नाही. त्याच प्रश्नाचा विचार करीत देशोदेशी फिरत असता एका झाडाखाली शांतपणे ध्यानस्त बसला असता मात्र जे उत्तर त्याला मिळाले त्याने त्याचे समाधान झाले. हीच आर्यसत्ये व त्यावर आधारित आर्यअष्टांग मार्ग.

बुद्धाला जीवनाच्या खऱ्या अर्थाचा प्रश्न पडला. हा प्रश्न ( म्ह. उलट अर्थाने जीवनाच्या निरर्थकतेचा प्रश्न ) पहिल्याने तो शरिराच्या मध्यस्थीने सोडवू पाहतो. पण त्या प्रयत्नात त्याला अपयश आले. दुसऱ्या खेपेस केवळ बुद्धीच्या जोरावर तोच प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न त्याने केला. पण याही खेपेला त्याला अपयश आले. तिसऱ्या खेपेस मात्र त्याला त्याच्या प्रश्नाचे उत्तर मिळाले. या खेपेस शरीर आणि बुद्धी ही दोन्ही द्वंद्वे त्याने जणू मनातून काढून टाकली होती आणि अगदी उत्स्फूर्त मनाने तो त्याच प्रश्नाचे ध्यान करीत होता व त्याला त्याच्या प्रश्नाचे उत्तर गवसले. त्याच्या समोर त्याने जो गेस्टाल्ट धरला होता तो गेस्टाल्ट अशा प्रकारे पूर्ण झाला.

गेस्टाल्ट मानसशास्त्राचा विचार करताना कोठलाही अपूर्ण आकार मनातल्या मनात पूर्ण करून घेण्याच्या आपल्या उपजत (Pragnance) प्रवृत्तीची ओळख आपणास झालीच आहे. आपल्या समोर समजा वर्तुळाकृती रेघ असेल आणि तिचा काही भाग तुटक असेल तर हे काय असा कोणी प्रश्न विचारल्यास हे वर्तुळ असेच उत्तर आपण देतो. कारण समोरच्या आकारातली फट बुजवून तो आकार आपण वाचतो. वस्तुतः समोरच्या आकार वर्तुळ म्हणण्याची गरज नव्हती. तरिही आपण त्यात असलेली फट स्वतःच्या मनाने बुजवून वर्तुळ असे म्हणतो. कारण कोठलाही आकार सलग करूनच तो पाहण्याची आपली प्रवृत्ती. समोरचा अर्धवट खुला असणारा दृक् आकार बंद करून आपण जसा तो आकार पाहातो तशाच प्रकारे आपल्या समोर जर खुला वादग्रस्त प्रश्न (Open question) असेल तर त्या प्रश्नाचे उत्तर शोधून तो प्रश्न म्हणजे तो खुला वैचारिक आकार बंद करण्याकडे आपली प्रवृत्ती असते. दृक् आकृतीची नवी मांडणी करून ती मांडणी आपण पूर्ण करतो. समोरच्या प्रश्नाचीही तशाच प्रकारे नवी मांडणी करून तो प्रश्न आपण बंद करतो.

समजा तुम्हाला खिळा ठोकायचा आहे. पण जवळ हातोडा नाही. अशा वेळी तुम्ही जवळच पडलेली पकड घेऊन त्याने तो खिळा ठोकता. किंवा पकड-सुद्धा नसली तर जोड्याने काम भागवता. हे करण्यासाठी अर्थात जोड्याचा जोडा हा वापर घटकाभर विसरून हातोडा हा नवा वापर ओळखता आला पाहिजे. थोडक्यात, समोरच्या वस्तूची मूळची मांडणी बदलून नवी मांडणी तुम्ही करता व नव्या कामासाठी ती वस्तू वापरता. हेच प्रॅगनान्स

कोणताही मानसिक प्रश्न मनावर ताण निर्माण करतो. आणि ताण निर्माण झाला की मन आणि शरीर तो ताण सगळीकडे सारखा करण्यासाठी धडपडू लागतात व त्यातून तो ताण निर्माण करणाऱ्या प्रश्नाचे उत्तर गवसते. आयुष्याचा शाश्वत अर्थ काय या प्रश्नाचा विचार बुद्ध सारखा करीत होता. या प्रयत्नामुळे त्याच्या मनावर ताण येत होता, हा ताण अर्थातच समतोलासाठी झटत असणार. येथवर तोच प्रश्न सोडविण्यासाठी बुद्धाने आपल्या परीने बरेच प्रयत्न केले होते. बुद्धाचे विचार जेव्हा स्वस्थ होते तेव्हा त्याच्या उत्स्फूर्त मनाने पूर्वीचीच सामग्री वेगळ्या तऱ्हेने मांडून त्याच्या प्रश्नाचे उत्तर त्याला दिले.

बुद्धाच्या आयुष्याने बुद्धाला प्रश्न टाकला व बुद्धाने त्या प्रकारचे उत्तर शोधून काढले. पण हे उत्तर अचूक होते असे आपण कशावरून म्हणतो? याच्यावरून की उर्वरित संपूर्ण आयुष्यभर त्या उत्तराने बुद्ध समाधानी होता. येथे एक गोष्ट ध्यानात ठेवावयास हवी. ती ही की बुद्धाचा प्रश्न हा त्याच्या अस्तित्वा संबंधी होता. तो एखादा भौतिक प्रश्न नव्हता. की ज्याचे उत्तर शास्त्रीय प्रयोगशाळेत तपासून घेता आले असते. बुद्धाला त्याच्या प्रश्नाचे जे उत्तर मिळाले त्या उत्तराने त्याला शेवटपर्यंत समाधान दिले. आयुष्याचा अर्थ काय या प्रश्नाने त्याला पुढे केव्हाही व्यथित केले नाही.

सात अधिक सात बरोबर किती या प्रश्नाचे समाधान फक्त चौदा याच आकड्याने पूर्णपणे होऊ शकते. चौदा या आकड्याऐवजी पंधरा, सोळा, वीस किंवा आणखी दुसरा असा कोठलाही आकडा जरी तेथे तुम्ही भरला तरी वरील कोड्याचे समाधानकारक उत्तर तयार होणार नाही. तीच गोष्ट मानवी आयुष्याचीही. मानवी आयुष्य हेही एक कोडे आहे. आणि ते त्या त्या वैयक्तिक आयुष्याचे कोडे आहे. वैयक्तिक कोडे असल्याने त्याचे उत्तरही वैयक्तिक आहे. वैयक्तिकपणे मिळविले जाणारे. प्रत्येक मानवी आयुष्य त्या आयुष्याच्या परीने अनन्य असते. म्हणून त्या आयुष्याच्या अर्थाचे उत्तरदेखिल अनन्यच असू शकते.

वरील गणितातल्या समीकरणाची उपमा वापरून आपण असे म्हणू शकतो की आयुष्य हे एक समीकरण आहे. ते समीकरण सोडविण्यासाठी त्या समीकरणाचे म्हणून जे उत्तर असेल तेच दिले गेले पाहिजे. मात्र आयुष्याच्या सार्थकतेच्या प्रश्नाबरची ही सगळी उत्तरे एका बाबतीत समान असतात. जो जो कुणी हे उत्तर शोधून काढण्यात यशस्वी होतो तो तो त्या उत्तराचा पाठपुरावा करता करता अनेक भिन्नभिन्न प्रकारे प्रगल्भ बनतो. त्याचे विचार प्रगल्भ बनतात. त्याची सहानुभूती, त्याची दया, त्याची करुणा थोडक्यात त्याची भावना प्रगल्भ बनते. त्याच्या मनाच्याला स्वतःचा असा काही खास थाट येतो की ज्याच्यामुळे तो, तो बनतो. येथून पुढे असा मनुष्य काळ चालनांचा प्रतिक्रिया राहात नाही. तो व्यक्ती बनतो. अमकी, तमकी व्यक्ती. पाहताच ओळखून येणारी.





प्रत्येक मानवी आयुष्य एक परी अनन्य आहे. म्हणून या अनन्य आयुष्याच्या सार्थकतेच्या प्रश्नाचे उत्तरही अनन्यच असू शकते. आयुष्याच्या सार्थकतेच्या प्रश्नावर केवळ बुद्धप्रणीत एवढेच एक उत्तर आहे असे नव्हे. बुद्धाच्या उत्तराबरोबरच ख्रिस्ताचेही उत्तर आहे. श्रीकृष्णाचेही उत्तर आहे. महात्मा गांधींचेही उत्तर आहे. ही उत्तरे अनेक संभवतात.

आयुष्याच्या अंतिम अर्थाच्या प्रश्नाचे उत्तर केवळ शरिराच्या दिशेने मिळवू पाहिल्यास मिळत नाही. किंवा केवळ तार्किक, चिकित्सक बुद्धिवूनही मिळत नाही. हे उत्तर शरीर आणि मन या दोहोंच्या एकत्रितपणातून, अंतर्यामातून मिळते. परंतु अंतर्याम ही देखिल एक मानवी वस्तुस्थिती असल्याने अंतर्याम अस्खलनीय आहे असे कधीही म्हणता येणार नाही. मानवाच्या आयुष्याच्या सगळ्या त्रुटी त्याच्या अंतर्यामातही प्रतिबिंबित होतात. मानवाप्रमाणेच मानवाचे अंतर्यामही सान्त आहे. म्हणून स्थलकालाच्या कायद्याने व दोषाने बद्ध आहे. अंतर्याम सर्वप्रज्ञावान नाही.

मनुष्य आत्मस्वतंत्र आहे आणि जबाबदार असल्याने एक प्रकारे बद्धही आहे. मनुष्याला स्वातंत्र्य असले तरी हे स्वातंत्र्य अमर्याद नाही. मानवी स्वातंत्र्याप्रमाणेच मानवी प्रज्ञादेखिल मर्यादितच आहे. म्हणूनच आयुष्याच्या अर्थाचे आपण मिळविलेले उत्तर चूक की बरोबर हे ठामपणे ठरविता येत नाही. हीच खरी मानवी आयुष्याची वेदना आणि शोकांतिका आहे. तेथे काहीही निश्चित कळत नाही. आणि असा हवाला देणाराही तेथे कोणी सापडत नाही.

मी पूर्ण नाही. जीवनाच्या प्रश्नाचे माझे उत्तर चुकू शकते. मी चुका करू शकतो. या विचाराचा एक मात्र मोठा फायदा आहे. ज्याला कुणाला स्वतःच्या स्खलनतेची जाणीव असते तो इतरांच्या चुकांच्या बाबतीत सहिष्णु असतो. स्वतःच्या मूर्खपणाला तो स्वतःच हासू शकतो. असा मनुष्य जीवनात सहृदय, अनाग्रही, निगर्वी असतो. आत्मप्रगल्भतेच्या मार्गावरची ही काही पाऊले.

स्वतःच्या आयुष्याला अर्थ आणावा यासाठी जेव्हा कोणी प्रयत्न करणार असतो तेव्हा आयुष्याला अर्थ येऊ शकतो या विचारावर त्याचा सर्वप्रथम दृढ विश्वास असावा लागतो. असा विश्वास असेल तरच कोणीही तो अर्थ मिळविण्यासाठी झटेल. त्याचबरोबर हा अर्थ मला प्राप्त होईलच याचीही शंभर टक्के खात्री नसल्याने इतरांच्या तसल्याच प्रयत्नाबद्दल तो तितकाच सहिष्णूही बनेल. याचा अर्थ इतर मनुष्य प्राण्यांच्या हिताहिताबद्दल मी निर्विकार असेन असा मात्र नाही. याचा अर्थ इतकाच की प्रत्येक मनुष्याला त्याचे स्वतःचे मत धारण करण्याचा अधिकार आहे हे मला मान्य असेल. स्वतःच्या मताइतकाच इतरांच्याही मताचा मी आदर करीन.

गंमत अशी की जगात मूल्ये आहेत की नाहीत याविषयी आपण बौद्धिक बाद घालित असलो तरी प्रत्यक्ष आचरणात मात्र हे चांगले ते वाईट या प्रकारचे मूल्यमापनही सहजपणे करीत असतो. यावरून एक गोष्ट दिसून येते. ती ही की प्रत्येक मनुष्याची स्वतःची अशी काही ना काही मूल्यव्यवस्था असून, प्रत्येकजण त्या मूल्यव्यवस्थेतून जीवनाच्या अर्थाचा अनुभव घेतो. कोणी निर्माणशील कलावंत असतो आणि निर्माणातून जीवनाच्या अर्थपूर्णतेचा अनुभव घेतो. कोणी चांगल्या कृत्यांतून, कोणी चांगुलपणातून, कोणी निसर्गसौंदर्याच्या आस्वादातून तर कोणी केवळ प्रेम देण्यातून वा घेण्यातून हाच अनुभव मिळवितात. एवढेच नव्हे तर ज्यांचे संपूर्ण आयुष्य म्हणजे केवळ दुःखच आहे अशीही मनुष्ये त्या दुःखाच्या बाबतीत एक ठाम भूमिका घेऊन त्या दुःखाचे रूपांतर दुःखावरच्या आत्मविजयात करताना दिसतात. म्हणजेच निरर्थकतेचे रूपांतर अर्थमयतेत करतात.

वरील प्रकारच्या आचरणाना जर आपण मूल्ये हा शब्द लावला तर त्या मूल्यांचे एकूण तीन गट आपण पाहू शकू. उदा. या आचरणाना आपण निर्माणात्मक, अनुभवात्मक आणि वैचारीक दृष्टीकोनात्मक आचरणे म्हणजेच मूल्ये म्हणू. आपल्या वैयक्तिक कर्तृत्वाच्या व निर्माणाच्या स्वरूपात जे काही आपण जगाला देऊ ते पहिल्या प्रकारच्या मूल्यात मोडेल, उलट अनुभवांच्या स्वरूपात जे काही आपण जगापासून घेऊ ते दुसऱ्या प्रकारच्या मूल्यात मोडेल. आणि समजा की एखाद्याच्या दुर्दैवाने असे काही एखाद्याच्या वाट्यास आले की जे सहन करण्याबाचून दुसरा काही इलाजच नसेल तर मनाने न खचून जाता धैर्याने ते सहन करण्याची तयारी दाखवून जर तो ते सहन करीत असेल तर ते तिसऱ्या प्रकारचे मूल्य होईल

वेदना, दुःख, शोक, आपल्या हातून घडलेल्या चुकीबद्दल खंत आणि मृत्यूची अटळता या मानवी जीवनातील वस्तुस्थिती आहेत. या ठिकाणी आपण चुकलो, आपले वर्तन अयोग्य झाले असे ज्याला आयुष्यात कधी वाटले नाही; किंवा ज्याला दुःखच कधी सहन करावे लागले नाही; किंवा जो कधीही मरणारच नसेल असा मनुष्य अद्याप जन्माला यायचा आहे. तेव्हा जीवनातले दुःख आणि स्वतःच्या चुकांबद्दल वाटणारी खंत या ज्या अपरिहार्य मानवी भावना आहेत त्यांच्या बाबतीत कसला ना कसला ठाम दृष्टीकोन मनुष्याला घ्यावाच लागतो. हा दृष्टीकोन घतला जातो की नाही, तो काय आहे यावरच ती निरर्थक वेदना माझ्या जीवनाला अर्थ व मूल्य बनणार की नाही हे ठरणार असते. दुःख उगाचा कवटाळून मी कायम अश्रु ढाळीत बसू शकतो. किंवा धैर्याने त्या दुःखाला तोंड देऊन त्याच दुःखावर मातही करू शकतो. दुःख हे सुद्धा प्रारब्धाचा भाग आहे. आणि ते तसेच वागविण्यात मानवी आयुष्याची शान आहे. प्रारब्धाच्या बाबतीत प्रारब्धाला धैर्याने तोंड देण्याची भूमिका आपण

घेतली पाहिजे. तरच प्रारब्धावर आपण मात करू शकतो. आपण कच खाल्यास प्रारब्धच आपणावर मात करते. दुःखाला तोंड देण्यात जर का मी कच खाईन तर दुःख मला दुबळे बनविते. पण ते अटळ आहे असे मानून जेव्हा मी त्याच दुःखाला तोंड देऊ लागतो तेव्हा माझ्या शक्तीचा कस लागून त्याच दुःखाचे रूपांतर माझ्या नव्या कर्तबगारीत होते. माझे स्वतःविषयीचे आकलन वाढविण्यात होते.

दुःखाच्या बाबतीत आपण हट्टी भूमिका घेऊ शकतो. आणि तशीच ती घेतली गेली पाहिजे. परंतु आपल्या हातून जर प्रमाद घडला असेल तर त्या प्रमादाच्या बाबतीत मात्र अशी हट्टी भूमिका घेतली जाता नये. तेथे खंत वाटणे ही भूमिका योग्य असते. पहिल्या प्रकारात प्रारब्धाला विरोध करणे योग्य असले तरी दुसऱ्या प्रकारात स्वतःलाच विरोध करणे, अशी गोष्ट पुन्हा माझ्या हातून मी घडू देणार नाही असे म्हणणे हे योग्य असते. प्रारब्ध बदलता येत नाही. पण स्वतःला आपण बदलू शकतो. हातून चूक घडणे व त्या चुकीबद्दल मनाला खंत वाटून तशी चूक परत हातून घडू नये म्हणून खबरदारी घ्यावेसे वाटणे हे फक्त मनुष्य प्राण्यालाच शक्य असते. काही लोक अशी भूमिका घेतात की मनुष्य हा केवळ परिस्थितीचा गुलाम आहे; त्याच्या हातून जे काही घडते त्याला तो जबाबदार नसतो, त्याची परिस्थिती जबाबदार असते. परंतु ही भूमिका मनुष्याला मनुष्य न ठरविणारी भूमिका आहे. मनुष्य जे काही करतो, जसा वागतो त्या सर्व गोष्टीना स्वतः जबाबदार आहे. किंबहुना अशा प्रकारे स्वतःच्या कृत्याना स्वतःला जबाबदार असणे यातच त्याचे मनुष्यपण साठून आहे. मनुष्याला जगात लौकिक यश, पद, प्रतिष्ठा मिळोत अथवा न मिळोत परंतु जगताना ज्या प्रकारची भूमिका तो धारण करील त्यावरूनच त्याच्या मनुष्यत्वाचा कस ठरणार आहे.

जीवनाच्या धकाधकीत दुसरे काहीही जरी आपण करू शकलो नाही तरी प्राप्त बिकट परिस्थितीत स्वतःच्याच संबंधी ठाम भूमिका आपण निश्चितच घेऊ शकतो. अशी ठाम भूमिका घेताच त्याच बिकट परिस्थितीचे रूपांतर जीवनविषयक धड्यात घडू शकते. म्हणजेच एक मूल्य आपण जगतो. म्हणून मानवी जीवन मूल्याशी निगडीत आहे या प्रबंधाशी वाद होऊ नये.

प्रत्येकाचे आयुष्य त्याला विचारते की 'मी कोण? जगणारा कधी त्या प्रश्नाचे आव्हान स्वीकारून उत्तर शोधू पाहातो. परिणामतः स्वतःलाच शोधू पाहातो. आणि हे उत्तर शोधता शोधता स्वतःला निर्माण करतो. आत्म-निर्माणाचे हे मार्ग अनेक वेगवेगळ्या प्रकारचे असू शकतात. परंतु आत्मनिर्माण किंवा प्रगल्भ व्यक्तिमत्व हे जर मानवी आयुष्यातील सर्वाधिक महत्वाचे मूल्य मानले तर बाकीची मूल्ये त्या विशिष्ट मूल्याच्या अनुषंगाने अस्तित्वात राहतात असे म्हणता येईल. अर्थपूर्ण जीवनक्रमाच्या अगणित शक्यता मनुष्यप्राण्याने गेल्या

हजारो वर्षात गिरविल्या आहेत, या सर्व शक्यता म्हणजे मानवी स्वातंत्र्याचा तेवढा विस्तृत आवाकाच होय. मनुष्यप्राण्याच्या प्रचंड संख्येशी तुलना करता या शक्यता कदाचित मर्यादित भरतील. परंतु मानवी आयुष्याचा वैयक्तिक दृष्टीकोनातून विचार करता हे स्वातंत्र्य अमर्याद आहे असेच म्हणावे लागेल.

मनुष्याचे स्वातंत्र्य म्हणजे त्याला उपलब्ध असणाऱ्या शक्यतांचे स्वातंत्र्य होय. आणि या शक्यतात आयुष्यात ज्या धारणा आपण धारण करू शकतो त्याही मोडत असल्याने मानवी स्वातंत्र्याचा आवाका खरोखरीच खूप मोठा आहे. जीवनात आलेल्या प्रसंगाच्या बाबतीत मनुष्याला अधिक काही करता आले नाही तरी काही विशिष्ट भूमिका निश्चितच घेता येते, हेही स्वातंत्र्यच होय.

काहीही न विसरता येणे हे मनुष्याचे एक महत्वाचे लक्षण आहे. मनुष्य त्याच्या आयुष्यात घडलेले काहीच विसरू शकत नाही. विसरण्यासाठी त्याला बौद्धिक प्रयास करावे लागतात. कधी बळेच ते दडपून टाकावे लागते. कधी ते बाजूला सारावे लागते. ( फ्रॉईड यांची मानसशास्त्रीय उपपत्ती. तसेच नित्शेचीही तात्विक विचारसरणी ) मनुष्य काहीही विसरू शकत नाही. स्वतःच स्वतःला तो वचन देऊ शकतो. आणि ते वचन खरे करण्यासाठी आटोकाट प्रयत्नही करू शकतो. वचन देणे, प्रतिज्ञा करणे व ती प्रतिज्ञा खरी करू पाहाणे या कृतीना मनुष्यप्राण्याच्या आयुष्यात फार महत्व आहे. मानसशास्त्रात ज्याला Individuation व्यक्तीकरण म्हणतात त्याचा उगम वरील घटनेत आहे, सर्वसामान्य मनुष्य ज्याला आदर्श मानतो तो हिरो ही व्यक्ती असते. तो चारचौघांसारखा संख्येतला केवळ एक नसतो.

व्यक्तिकरणाची कल्पना काहीशी तांत्रिक आहे. 'व्यक्तित्व' 'विशिष्ठत्व' ( इंडिव्हिज्युॲलिटी ) हा शब्द आपण अनेक वेळा ऐकतो. व्यक्ती विरुद्ध समाज अथवा समूह ह्याही कल्पना आपण वारंवार ऐकलेली आहे. पण व्यक्ती, व्यक्ती कशी होते ? हे आपणाला बरोबर माहित नसते व्यक्ती, व्यक्ती बनण्याच्या, व्यक्तिकरणाच्या प्रक्रियेमधून व्यक्ती बनते. एका दृष्टीने ही एक जैविक प्रक्रिया आहे. वनस्पती जीवनापासून प्राणीजीवनापर्यंत कोणत्याही प्रकारचा सचेतन आयुष्यक्रम घ्या. त्यात व्यक्तिकरणाला महत्व आहेच. सचेतन आयुष्य म्हणजे व्यक्तिकरणाच्या वेगवेगळ्या पायऱ्याच होत. वेगवेगळ्या प्रकारच्या वेगवेगळ्या पायऱ्या.

प्रत्येक प्राणी स्वतःच्या वाट्याचे आयुष्य जगतो आणि ते संपले की मरून जातो असे म्हटले तर ते वावगे ठरणार नाही. परंतु हे विधान सर्वार्थाने खरे नाही. कारण अमिबा नावाचा जीव मरत नाही. विशिष्ट इतकी त्याची वाढ झाली की तो मधेच तुटतो आणि त्याचे दोन वेगवेगळे अमिबा तयार होतात. तेव्हा अमिबाला मरण नाही. पण त्याला पृथक व्यक्तित्वही नाही. वा स्वतःची स्वतंत्र ओळखही

नाही. त्याचे व्यक्तिपण म्हणजे केवळ अवस्थांतर. एक क्षणभंगुर आकार की जोही काही क्षणाच्या अवधित पुन्हा बदलणार आहे. अमिबाचे आयुष्य केवळ पैसच्या परिमाणात व्यक्त होते. अमिबा हे वेगवेगळे जीव असतात. परंतु त्यांच्या आयुष्याला काळाचे परिमाण नाही. ते नव्या जीवांना जन्म देत नाहीत. वा पिलाना जन्म देता देता स्वत. म्हातारेही होत नाहीत. ते वाढतात व स्वतःच परत छोटे वा तरूण बनतात.

याच्या उलट सगळे वरिष्ट वर्गीय जीव. हे जीव व्यक्ती म्हणून विकसित होतात. त्याना जन्म असतो, तारुण्य, वृद्धत्व आणि मृत्यूही असतो. म्हणजेच ते पैस आणि काळ ही दोन्ही परिमाणे वापरतात. ज्या विशिष्ट वंशात त्यांची उत्पत्ती होते त्या वंशातून पृथक बनून त्यांचा शेवट होतो. प्रत्येकजण हा स्वतःच स्वतःचा अखेर असतो. अमिबा जसा पुन्हा स्वतःच्या जातात विलिन होतो तसा तो होत नाही. वरिष्ट वर्गीय जीव एकेकटी व्यक्ती म्हणून संपूर्ण आयुष्यभर कालक्रमणा करतात. तसे करताना मध्येच केव्हा तरी स्वतःच्या वारसाना जन्म देतात, ( नव्या आयुष्याला जन्म देतात ) व आयुष्य संपताच मरून जातात. त्यानी जन्म दिलेले वारस त्यांच्या मागे उरले तरी ते स्वतः मात्र मृत्यूबरोबरच नष्ट होऊन जातात.

मनुष्याच्या आयुष्याचा साचा देखिल याच प्रकारचा आहे. आमच्या मागे आमचे अगणित पूर्वज होऊन गेले. आमच्या नंतर अगणित वंशज पुढे राहातील. मध्ये केव्हातरी आम्ही होऊन गेलेलो असू.

मनुष्य आणि इतर प्राणी यात मोठा फरक हा की मनुष्य मरणाधिन आहे याची पूर्वकल्पना मनुष्याला असते. इतर प्राण्याना ती असत नाही. पशवादी प्राणी मरण टाळण्यासाठी धडपडतात. परंतु आपण मरणाधिन आहोत याची कल्पना त्याना असत नाही. त्यामुळे त्यांचे सर्वात मोठे ध्येय जीव टिकवून धरण्या-पुरते मर्यादित असते. तसेच प्राण्यांची कल्पनाशक्ती चालू क्षणापलिकडे जात नसते. तसेच मोठ्या समुदायाचे आपण घटक असतो हेही त्याना कधी कळत नाही.

मनुष्यापाशी प्रतीके असल्याने भाषा आहे आणि भाषा असल्याने स्वतःच्या अलगपणाची कल्पना आहे आणि अशी अलगपणाची कल्पना असल्याने आपल्या-बरोबरच आपल्या आयुष्याचा शेवट होईल हीही कल्पना आहे. अर्थात हा शेवट कधी, कसा घडून येईल याची निश्चित कल्पना कोठल्याही मनुष्याला असत नाही. मात्र हा शेवट निश्चितपणे आहे याची पूर्वकल्पना प्रत्येक मनुष्याला असतेच. आणखी एक गोष्ट अशी की मनुष्याला जसे भूत आणि भविष्यकाळचे भान असते तसे भान इतर प्राण्याना नसते. आपणाला काळ कल्पनेत मोजता येत असल्याने दीर्घकाळाची कल्पना आपल्या मनाशी आपण करू शकतो आणि अशी कल्पना केल्याने आपल्या स्वतःच्या क्षणभंगुरत्वाची आपली जाणीव तीव्र बनते. तसेच

केवळ याच कारणामुळे प्रत्यक्ष जगापेक्षा अधिक कल्पनारम्य जगाची कल्पना रंगविण्याकडे आपल्या मनाची प्रवृत्ती होते.

काहीही केले तरी आपली आयुर्मर्यादा आपण वाढवू शकत नाही. म्हणून मग थोड्या काळात जास्तीत जास्त आयुष्य जगून दीर्घायुष्याची उणीव भरून काढण्याचा प्रयत्न आपण करतो. पृथ्वीतलावरची आमची वसती, आमचे व्यक्तिकरण जर थोड्या काळाचे असेल तर मग ते जास्तीत जास्त पूर्णत्वाला नेले पाहिजे असे आपणास वाटते. आपल्या आयुष्याचे जास्तीत जास्त काही करावे असे आपणास वाटते. आयुष्याचे दिवस वाढविता येत नाहीत मग तेच आयुष्य अधिक उत्कट बनवून जगावे अशी काहीशी यामागची भूमिका असते. सारांश, आपण स्वतःसाठी अधिकात अधिक व्यक्तिकरणाची वा आत्मविकासाची अपेक्षा करीत असतो. व ही अपेक्षा साध्य करण्यासाठी स्वतःसाठी आत्मपरिपूर्तीचे ध्येय धारण करतो. एर्वीतेवी जर आपण थोडाच काळ येथे राहाणार आहोत तर आपल्या सगळ्या गुणशक्ती जास्तीत जास्त विकसित करून जावे असे आपणास वाटते. आत्मपरिपूर्तीचे ध्येय हे केवळ मनुष्यालाच शक्य आहे कारण ते ध्येय धारण करता येण्यासाठी प्रतीक व्यवस्था लागते. आणि प्रतीके केवळ मनुष्येच तयार करू शकतो.

मनुष्य ध्येये रचतो, प्रतिज्ञा करतो, प्रतिज्ञा पूर्ण करतो. परंतु हे सर्व तो त्याच्या स्वतःच्या जगात करू शकतो. जर तो माणसाच्या जगात राहात नसता तर त्याला हे साध्य झाले नसते. आणि माणसाचे जग म्हणजे बंधनाचे जग. म्हणजे जगातली प्रत्येक व्यक्तीच जर आत्मपरिपूर्तीसाठी झटू लागली तर जगात मोठा अनवस्था प्रसंग ओढवेल असे तर नाही ? नाही ही भीती निराधार आहे.

मनुष्याच्या ठिकाणी ज्याप्रमाणे व्यक्तिकरणाची प्रवृत्ती कार्यप्रवण आहे तशाच प्रकारे संपूर्ण जग त्याच्या आयुष्यक्रमात भाग घेत राहाण्याची इन्व्हॉल्व्हमेंटची प्रवृत्ती ही कार्यप्रवण आहे मनुष्य स्वतःवर जितके प्रेम करतो तितके जरी नाही तरी तसेच प्रेम तो स्वतःच्या कुटुंबावर, कुळावर, देशावर, अखिल मानवसमुदायावर करतो.

एक वैयक्तिक आयुष्य, मग ते आयुष्य कितीका समृद्ध असेना, या प्रचंड विश्वाशी तुलना करता त्या आयुष्याला स्वतःलाच अगदी क्षुल्लक वाटते. हा क्षुल्लकपणा मनुष्याला भय घालतो. कारण या क्षुल्लकपणात जे जे अभिप्रेत आहे ते ते सर्व त्याच्या मनावर दडपण आणते आणि त्याला इतर मनुष्यांचा विचार करावयास, त्यांची कदर करावयास भाग पाडते.

सर्व प्रकारचे प्राणी त्यांच्या त्यांच्या जगातील्या आयुष्यात गुंतलेले असतात. अनुवंशिकतेचा कायदा त्यांच्या रंगावर आणि आकृतिवरच स्वतःचा अंमल चालवित नाही तर त्यांच्या आचरणावरही तसाच अंमल चालवितो. प्राणी



अनुक्रमणिका



जे जे आचरण करतात त्या आचरणात त्यांच्या वंशाच्या आचरणाचे प्रतिबिंब उमटत असते. मात्र प्राण्याना त्याची जाणीव नसते. कळण्याची गरजही नसते. कारण आनुवांशिकतेचा कायदा त्याना विसरता येणार नसतो.

मनुष्यप्राण्याची गोष्ट यापेक्षा अगदी वेगळी आहे. आपले आयुष्य क्षणभंगुर व अनिश्चिततेने ओतप्रत भरलेले आहे या जाणिवेच्या दडपणामुळे स्वतःच्या आयुष्यातून जास्तीत जास्त लाभ उठविण्याचा प्रयत्न आम्ही करतो. आमच्या प्रगत मानसिक शक्तीमुळे ज्याला शास्त्रीय परिभाषेत बिल्ट-इन वर्तन किंवा सहजप्रवृत्ती म्हणतात त्या वर्तनापासून आपण बऱ्याच प्रमाणात मुक्त आहोत. आपल्या ठिकाणी विकसित कल्पनाशक्ती असल्याने आपणा प्रत्येकाचे स्वतःचे खाजगी विश्व आहे. प्रत्येकाची जाणीवसुद्धा खाजगी आणि स्वतंत्र असल्याने वेगळ्या स्वतंत्र आयुष्याची प्रत्येकाची ओढसुद्धा मोठी असते.

मनुष्य हा समाजात वाढला असल्याने त्याच्या ठिकाणी काही एक सामाजिक बुद्धी जन्मतःच आहे. अगदी सहजप्रवृत्तींगत. स्वाभाविकपणेच आपण इतर माणसांची कदर करतो. कळकळ वाळगतो.

स्वतःच्या डोक्यात येणाऱ्या कल्पनांसाठी मनुष्यप्राणी प्रतीके, खूणा, चिन्हे बनवितो. ही प्रतीके वापरून विशेषतः शब्दरूपी प्रतीके वापरून वेगवेगळे विचार ( आयडियाज ) तो तयार करू शकतो. विचारांच्या साहाय्याने प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष अनेक घटकांचा विचार करू शकतो. ही प्रतीके त्याला त्याच्या विशिष्ठत्वाची जाणीव करून देतात. आणि हीच प्रतीके त्याला त्याच्यासारख्या इतर मनुष्य-प्राण्याबद्दल सहानुभूती, प्रेम बाळगावयास प्रवृत्त करतात.

सारांश मनुष्यासकट सर्व प्राण्यांच्या ठिकाणी व्यक्ती बनण्याची आणि समूहात एकरूप होऊ पाहण्याची अशा दोन्ही प्रवृत्ती असतात. मनुष्याच्या ठिकाणी याच दोन्ही प्रवृत्ती अधिक उत्कट प्रमाणात आहेत. व्यक्तीकरण केवळ शारिरीक बाबतीतले असेल. एकाच कुटुंबातला एक घटक इतर सर्व घटकांपेक्षा अजिबात वेगळा असू शकेल. हे शारिरीक व्यक्तिकरण. व्यक्तीकरण शारिरीक चेतना वापरण्याच्या बाबतीतले असेल. मांजराच्या सगळ्या हालचाली या या प्रकारच्या व्यक्तिकरणात मोडतात. मांजर नेहमी एकट्याने वावरते. व्यक्तिकरण मानसिक स्वरूपाचे असेल. या प्रकारचे व्यक्तिकरण मनुष्याच्या ठिकाणी आढळून येते. व्यक्तिकरणाच्या अशा प्रकारे अगणित परी आहेत. कारण व्यक्तिकरण आणि गुंतणे या दोन्हीही प्रक्रिया असल्याने त्याना अशा वेगवेगळ्या दिशा असू शकतात तशाच प्रकारे त्यांच्या वेगवेगळ्या पायऱ्याही असू शकतात.

व्यक्तिकरण आणि सहभागित्व या दोन्हीही प्रक्रियाना अन्वादात महत्व आहे. कारण अन्वादातल्या आत्मप्रगल्भतेच्या, आत्मपरिपूर्तीच्या, आत्मसाफल्याच्या आणि अर्थपूर्ण जीवनक्रमाच्या विचाराशी या दोन्ही प्रक्रियांचा संबंध आहे.

प्रगल्भता म्हणजे व्यक्तिमत्त्वाची समतोल वाढ. ज्याची वाढ अशा प्रकारे समतोल आहे अशा व्यक्ती एकाच वेळी वैशिष्ठ्यपूर्ण असतात आणि एकूण मानवी जीवनाबद्दल अपार सहानुभूती व करुणा बाळगणाऱ्याही असतात.

मनुष्यप्राण्याला विशिष्टत्व कसे लाभते (म्ह. त्याचे व्यक्तिकरण कसे घडून येते ; याचा मानसशास्त्रीय दृष्टीतून अधिक सखोल विचार युंग या मानसचिकित्सकाने केला आहे. युंग हे फ्रॉईड यांचे प्रारंभीचे सहकारी. साहजिकच त्यांची काही प्रमेये फ्रॉईड यांच्या विचारसरणीवर बेतलेली आहेत तथापी स्वतंत्र अशीही त्यांची काही प्रमेये आहेत उदा. सामूहिक अबोध मन व आर्किटाईपच्या स्वरूपातील त्या मनाचे घटक हे त्यांचे प्रमेय स्वतंत्र आहे.

युंग म्हणतात की मानवी जीवनक्रमातील काही प्रसंग वा सिच्युएशन्स टिपिकल किंवा ठसेबाज असतात. मानवीच नव्हे तर अमानवी (पशू, पक्षी, जलचरादी प्राण्यांच्या) जीवनक्रमातील काही प्रसंग सुद्धा ठसेबाज असतात. उदा. प्रत्येक प्राण्याला आई व बाप दोन्हीही असतात. त्याला कदाचित स्वतःचा बाप ओळखता आला नाही तरी आई निश्चितच ओळखता येते. अर्थात अगदी कनिष्ट पातळीवरील प्राण्यांच्या बाबतीत आई म्हणजे एक केवळ विवक्षित भावनाच फक्त असेल. महत्त्वाचा मुद्दा हा की प्रत्येक प्राण्यापाशी आई नावाची ओळख असेल. काही विशिष्ट भावनिक संवेदना म्हणजे ही ओळख होय. आई प्रमाणेच मादी विषयक संवेदना त्याच्यापाशी असतील इतर नर विषयक संवेदना असतील. कारण या संवेदना नसतील तर त्या त्या प्रसंगी कसे वागावे हे त्याला कळणार नाही. सांगायची गोष्ट ही की प्राण्यांच्या जीवनक्रमात पिढ्यानपिढ्या हे ठराविक प्रसंग घडत गेल्याने त्या प्रसंगांचा ढोबळ अस्पष्ट आराखडा त्यांच्या मनाच्या ठिकाणी तयार होऊन राहतो. हा नकाशा म्हणजे एक एक भावनाच होय. त्या त्या प्रसंगी मग ती ती भावना उद्दिपित होऊ शकते. निदान ती भावना उद्दिपित होण्याची शक्यता तेथे असू शकते.

मनुष्याच्या बाबतीत या भावनांच्या प्रकारांची संख्या अधिकच असते. कारण ज्या ठसेबाज प्रसंगांतून मनुष्यप्राणी जातो त्यांची संख्याही अधिक आहे. उदा. प्रत्येक मनुष्यप्राण्याला आई व बाप ही दोन्हीही नाती असतात. या दोन नात्यात प्रत्येक मानवी बालक वाढते. प्रत्येक मानवी बालक म्हणजे हे त्रिकूटनाटकच होय. या त्रिकूटाचे परस्परांबरोबरचे संबंध अनेक वेगवेगळ्या दिशा घेणे शक्य असते. मनुष्य जातीने या सगळ्या प्रसंगांचा व तद्विषयक भावनांचा अनुभव आपल्या येथवरच्या इतिहासात परत परत घेतला आहे. व म्हणूनच या भावनांचे वेगवेगळे ढोबळ नकाशे प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी संभाव्यता म्हणून सुप्त रूपात असतात. याच नकाशांना युंग आर्किटाईप्स म्हणतात. आर्किटाईप्स मूलतः सुप्त असतात. पण तसाच प्रसंग घडताच ते उत्तेजित होतात व मनुष्याला

त्या त्या भावना वाटावयास लावतात. 'वाटावयास लावतात' हा शब्दप्रयोग तितकासा बरोबर नाही. आर्किटाईप्स हे त्या भावनेचे कारण नव्हे. ती भावना म्हणजेच आर्किटाईप होत. तेव्हा आर्किटाईप जागृत होतो म्हणजे ती भावना मनात उमटू लागते.

आर्किटाईप् या भावनाच असतात याचे कारण हे की ज्याला आपण प्रतिपादनात्मक विचार म्हणू आणि जो विचार शाब्दिक मांडणीवर आधारित असतो तो शब्दबद्ध विचार मानवी अनुभवक्षेत्रात फार उशिरा आला आहे. शब्द तयार करता येण्यापूर्वी आणि शब्दांच्या साहाय्याने अनुभव घेता येण्यापूर्वीही मनुष्य अनुभव घेतच होता आणि घेतलेले अनुभव साठवितच होता. हे अनुभव तो भावनांनी घेत होता आणि या अनुभवाशी सुसंगत चित्रे मनाशी रंगवून तो ते साठवित होता. ही चित्रे म्हणजे प्रिमॉर्डिअल इमेजिस. किंवा आर्षचित्रे. चित्रात समजा एकएक भावनिक संवेदना ग्रथित असली तर एका संपूर्ण प्रसंगासाठी चित्रांचा एक संपूर्ण पुंजका तयार होऊन ती संपूर्ण भावनाच त्या पुंजक्यात ग्रथित होत होती.

मनुष्याच्या ठिकाणी ही चित्रे व त्यांच्याशी संबंधित भावनिक नाट्य आनुवांशिकतेच्या तत्वावर पिढ्यानपिढ्या संक्रमित होत आले आहे. ही चित्रे बहुतांशी कॉम्प्लेक्स प्रसंगाचीच असतात. कारण उत्कट भावना ही नेहमीच कसल्या बाह्य वस्तूघटकाबरोबरच्या ( या वस्तूघटकात अर्थातच इतर मनुष्ये, प्राणी वगैरेही येतील ) संबंधातून उत्पन्न होणे शक्य असते. सारांश, ज्या नाट्यचित्रात भावना ग्रथित आहे अशी अनेक संक्षिप्त नाट्यचित्रे मनुष्याच्या मनात वा मेंदूत घर करून आहेत.

आर्षचित्रे आणि मूलठसे ( प्रिमऑर्डिअल इमेजिस अँड आर्किटाईप्स ) आनुवांशिकतेच्या तत्वानुसार एका पिढीतून दुसऱ्या पिढीत संक्रमित होतात म्हणून प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी ती जन्मतःच असतात. मनाच्या याच भागाला युंग सामूहिक असंज्ञ मन म्हणतात. सामूहिक असंज्ञ मनाप्रमाणेच प्रत्येक मानवी जीवाच्या ठिकाणी व्यक्तिक असंज्ञ मनही असते. सामूहिक असंज्ञ मन अखिल मानवजातीच्या सामुदायिक ठसेबाज अनुभवातून बनते. तर व्यक्तिक असंज्ञ मन व्यक्तिच्या स्वतःच्या अनुभवातून बनते. असे कित्येक अनुभव असतात की जे आपण विसरून जावे असे व्यक्तिला वाटते. व्यक्ती ते विस्मरणात दडपून टाकते. काही अनुभव आपोआपही विसरले जातात. हे अशा प्रकारचे सर्व अनुभव मिळून व्यक्तिक असंज्ञ मन बनते.

हे युंग यांचे मानवी मनासंबंधीचे सर्वसाधारण प्रमेय.

व्यक्तिकरणाच्या प्रक्रियेचा विचार करताना जर आपण असे म्हटले की ही प्रक्रिया जैविक प्रवृत्तीच्या स्वरूपाची आहे. प्रत्येक जीव काही ना काही प्रमाणात

विशिष्ट म्हणजे एक स्वतंत्र व्यक्ती बनू पाहतो. टिपिकल प्रसंग आणि त्या प्रसंगांशी सुसंगत भावना या सर्वांचे चित्रमय आराखडे मानवी मनात घर करून असतात व ते एका पिढीकडून दुसऱ्या पिढीत संक्रमित होतात असेही आपण म्हटले. जर आपला हा तर्क खरा धरला तर प्रत्येक मानवी जीव वयाच्या विशिष्ट टप्प्यावर विशिष्ट मानसिक प्रश्न जगत असला पाहिजे व त्या टप्प्यावर त्याच्या मनात विशिष्ट भावना व त्या भावनेबरोबरच ती, ती चित्रनाटये जागृत होत असली पाहिजेत असेही आपणास म्हणता येईल. कारण जीव जेव्हा प्रौढ बनतो किंवा दुसऱ्या शब्दात, स्वतंत्र बनतो तेव्हा तो एकदम, एकाचवेळी तसा बनत नाही. तो टप्प्याटप्प्यानेच प्रौढ बनतो. यातील प्रत्येक टप्पा म्हणजे त्या त्या वयासाठी एक मोठा मानसिक प्रश्नच असतो. हा मानसिक प्रश्न सोडविता आला तर तो त्याच्या पुढील दुसऱ्या नव्या टप्प्यावर जाणार असतो. कालांतराने हा नवा टप्पा मागे टाकताना त्याही टप्प्याचा विशिष्ट प्रश्न त्याला सोडवावा लागतो,

मूल प्रौढ होते म्हणजेच त्याच्या आईवडिलांपासून व्यक्तित्वाने ते स्वतंत्र बनते. हे बनणेसुद्धा टप्पाटप्प्याने घडून येणार असते. ते एका क्षणात घडत नाही. प्रारंभी मूल त्याची आई व त्याचे वडील ही त्रयी एकत्र असते. यातून त्यांच्या परस्परसंबंधांची एक घाटणी तयार होऊन राहाते. मूल त्याच्या आईशी एका प्रकारे जमवून घेईल. वडिलांशी दुसऱ्या प्रकारे जमवून घेईल. तीच गोष्ट त्याच्या आईवडिलांच्या त्याच्या बरोबरच्या जमवून घेण्याचीही. या सर्वांच्या एकत्रित वागण्याचा परिणाम म्हणून त्या मुलाची जगाबरोबर व्यवहार करण्याची काही एक घाटणी तयार होते. या घाटणीत मुलाकडे भूमिका लहानाची असते मूल लहानपण टाकू पाहिल. पण त्याचे आईवडिल त्याला ते टाकू देणार नाहीत कदाचित बुद्धिपुरस्सर नसेल. पण स्वतःच्या नकळत, स्वतःला काही एक मानसिक समाधान मिळते म्हणून ते तसे करतील. मग संघर्ष येईल. या संघर्षात मूल कदाचित विजयी होईल, कदाचित विजयी होणार नाही. जर ते अपयशी झाले तर त्याचा पुढील सगळा मानसिक वाढ कुंठित होईल.

प्रत्येक मानवी पिढीत प्रौढ बनण्यासाठी होणारा हा संघर्ष घडून आला आहे आणि पुढेही घडत राहणार आहे. आणि याची सूचक चित्रे प्रत्येक मानवी मनात आहेत. अर्थात प्रौढत्व हे केव्हाही सर्वांसाठी एकाच ठाम ठशाचे असणार नसते. कारण, जरी प्रत्येक व्यक्तीला तिच्या आयुष्याच्या प्रत्येक विशिष्ट टप्प्यावर विशिष्ट जीवनविषयक प्रश्नाला तोंड द्यावे लागत असले तरी या प्रश्नाची सोडवणूक कधीही एकाच स्वरूपाची नसते. आणि असणारही नाही. मनुष्याला कल्पनाशक्तीचे व धारणेचे स्वातंत्र्य आहे. वेगवेगळ्या परिस्थितीत तो वेगवेगळी धारणा धारण करू शकतो. म्हणूनच आजवर त्याने अनेक प्रकारची कर्तृत्वे संपादन केली आहेत. ही कर्तृत्वे म्हणजे निरनिराळ्या प्रकारचे जीवनमार्ग होत. हे एक एक



अनुक्रमणिका

कर्तृत्व म्हणजेही एक एक प्रतीक होय असे जर आपण मानले तर अशी अनेक प्रतीके मानवी मनात आढळतील. या प्रकारच्या सगळ्या दिशासूचक प्रतिकांच्या एकत्रित समूहाला युंग सेल्फ असा शब्द वापरतात. तसेच यातील एकच दिशासूचक प्रतीक निवडून कोणी जेव्हा ते खरे करून दाखवितो तेव्हा त्याही अवस्थेला ते सेल्फ हाच शब्द वापरतात. मात्र मागाहूनच्या अवस्थेला त्या व्यक्तीने स्वतःचे सेल्फ आत्मसात केले असा शब्दप्रयोग वापरतात. सेल्फ आत्मसात केले जाणे म्हणजे व्यक्तिकरण घडून येणे.

मानवी जीवाच्या व्यक्तिकरणाचे युंग यांचे प्रमेय जरी स्वतंत्र असले तरी या व्यक्तिकरणासाठी जी मानसिक ऊर्जा आवश्यक असते त्या ऊर्जेसंबंधिचे प्रमेय फ्रॉईड यांच्याकडून जवळपास जसेच्या तसे ते स्वीकारतात. फ्रॉईड मानसिक ऊर्जेला लिबिडो किंवा प्रेमशक्ती म्हणतात. कारण ही ऊर्जा कसल्या ना कसल्या वस्तू-घटकाला ( यात इतर मानवी व्यक्तीही येतात ) जवळ करू पाहते असे त्याना वाटते. किंबहुना प्रेम करणे, बिलगणे हेच या ऊर्जेचे व्यवच्छेदक लक्षण होय असे फ्रॉईड म्हणतात. युंग प्रेमव्यापाराऐवजी संपूर्ण मानसिक व्यापाराशीच या ऊर्जेचा संबंध जोडतात आणि लिबिडो म्हणजे व्यक्तीच्या ठिकाणी असणारी समग्र मानस ऊर्जा अशी लिबिडो या शब्दाची व्याख्या करतात. फ्रॉईड आणि युंग यांच्या मानवी मनासंबंधीच्या धारणेतला हा पहिला मोठा फरक.

मात्र दोघांच्या भूमिकेतला समान मोठा दोष हा की फ्रॉईड आणि युंग हे दोघेही लिबिडो ही ऊर्जा आणि ती ऊर्जा ज्यांच्यावर परिणाम करते ते इगो, सुपरइगो आदी वेगळ्या व्यवस्था अशा दोन पृथक् व्यवस्था गृहित धरतात. इगो, वा सुपरइगोला स्वतःच्या सामर्थ्याने हालचाल करता येत नाही. कारण त्याना स्वतःची कार्यशक्ती नसते. ही कार्यशक्ती लिबिडोच्या ठिकाणी असते. इगो वगैरेंच्या हालचालींसाठी लिबिडो कार्यशक्ती पुरवितो; त्याना स्वतःची कार्यशक्ती असत नाही. या प्रबंधाचा मोठा दोष हा आहे की लिबिडो मुळातच इगोला वगैरे कार्यान्वित का करावे याचे तर्कशुद्ध स्पष्टीकरण त्यात मिळत नाही.

मात्र तात्विक प्रमेयातल्या या दोषाची संपूर्ण जबाबदारी एकट्या फ्रॉईड यांच्यावर पडत नाही. ज्या कालखंडात फ्रॉईड आणि युंग आपली प्रमेये रचित होते त्या कालखंडाच्या सर्वसाधारण बौद्धिक वातावरणाचा तो परिणाम होता. एखादा मनुष्य उपजत प्रतिभेने जरी कितीही श्रेष्ठ व महान असला तरी त्याच्या काळाच्या बौद्धिक मर्यादा तो सर्वांशाने ओलांडू शकत नाही हेच यरील उदाहरणा-वरून दिसून येते. फ्रॉइड जेव्हा आपली तात्विक प्रमेये मांडित होते तेव्हा हेल्महोल्झ या भौतिक शास्त्रज्ञाच्या शास्त्रीय विचारसरणीचा खूप मोठा पगडा एकूण शास्त्रीय जगतावर होता. शास्त्रीय विचारसरणी म्हणजे हेल्महोल्झ याच्या विचारसरणीसारखी विचारसरणी असेच जणू तेव्हा ठरून गेले होते. साहजिकच

फ्रॉईड यांनीसुद्धा स्वतःची मानसविषयक प्रमेये हेल्महोल्त्स यांच्या प्रमेयांच्याच नमुन्यात बसविण्याचा प्रयत्न केला होता यात आश्चर्य नाही.

हेल्महोल्त्स म्हणतात की सृष्टी मूलतः दोन मूलद्रव्यांची बनली आहे. यातील एक द्रव्य अॅटम किंवा अणूचे व दुसरे एनर्जी किंवा उर्जेचे. अणू म्हणजे जड द्रव्याचा सर्वात लहान अंश. अणूचे आणखी लहान भाग करता येत नाहीत. तसेच अणूच्या स्वरूपात बदलही घडून येत नाही. अणूंची बेरीज होऊ शकते. पण अणूमध्ये रूपांतर होऊ शकत नाही. दुसरी गोष्ट, अणूना स्वतःची कार्यशक्ती नाही ही शक्ती फक्त उर्जेमध्ये आहे. अणू स्वतः होऊन काहीही घडवून आणू शकत नाही. आणू शकणारही नाहीत. ऊर्जा त्याना हालचाल करावयास भाग पाडते. त्यांचे वेगवेगळ्या संख्येतील मिश्रण घडवून आणते. त्यांची संयुगे बनविते. तिसरी गोष्ट विश्वातल्या एकूण अणूंची संख्या निश्चित आहे. तशाच प्रकारे एकूण ऊर्जेचा साठादेखील निश्चित आहे. ऊर्जा मूलतः विषम प्रमाणात विभागली गेली असल्याने ती समपातळीत येऊ पाहाते व त्या तिच्या प्रयत्नांचा परिणाम होऊन अणूना चालना मिळून त्यांची वेगवेगळ्या प्रमाणातील संयुगे तयार होतात.

हेल्महोल्त्स यांच्या वैश्विक मॉडेलमध्ये अणू आहेत. तर फ्रॉईड यांच्या मॉडेलमध्ये अणूंऐवजी इगो, सुपरइगो आहेत. तिकडे ऊर्जा आहे. इकडे प्रेमशक्ती आहे. इगोला वगैरे स्वतःची कार्यशक्ती प्रेमशक्तीकडून मिळते. प्रेमशक्ती इगोला वगैरे चालना देते. आयुष्याच्या शेवटीशेवटी प्रेमशक्तीच्या प्रमेयात फ्रॉईड यांनी थोडा बदल केला आहे. मानवी व्यक्तित्वात राहून त्या व्यक्तिवर तावा चालविणारी शक्ती दोन प्रकारची आहे असे ते मानू लागले. एक प्रेमशक्ती तर दुसरी द्वेषशक्ती. मात्र इगो जर मूलतःच या शक्तींशी संबंधीत नाही तर मागाहून तरी इगोचा संबंध या शक्तींशी का यावा व इगो–सुपरइगो वगैरे हालचाल का करू लागावेत याचा उलगडा फ्रॉईड कोठेही करीत नाहीत.

युंग यांचे मनोवाचक मॉडेल साधारणपणे फ्रॉईड-मॉडेलसारखेच आहे. फरक काय तो एकदोन बाबतीत. फ्रॉईड वैयक्तिक असंज्ञ मन मानतात. युंग वैयक्तिकाबरोबरच सामूहिक नावाचे दुसरेही एक असंज्ञ मन मानतात. दोन, फ्रॉईड मानसिक ऊर्जा प्रेम व द्वेषमूलक अशा दोन प्रकारची मानतात. युंग सर्व ऊर्जा एकाच प्रकारची किंवा प्रेम व द्वेष या फरकांच्या आधीपासूनची मानतात.

फ्रॉईड आणि युंग या दोघांचीही मॉडेल्स विचारात घेतली तरी एका प्रश्नाचे उत्तर मिळावयाचे उरतेच. ऊर्जा आणि ती उर्जा ज्याना चालना देऊन काही ना काही परिणाम घडवून आणते ते मनोघटक या दोन्ही व्यवस्था अजिबात पृथक असताना त्यांचा संबंध कोणत्या कारणास्तव घडून यावा ?

या प्रश्नाचे उत्तर विश्वरचनेसंबंधीच्या नव्या मॉडेलमधून मिळते आणि हेच मॉडेल मनोरचनेला अखेरीस लावले जाते. नवे विज्ञान अणू आणि ऊर्जा ही

पृथक्पणे अस्तित्वात आहेत असे मानीत नाही. तर अणू आणि उर्जा मिळून जी रचना होते तोच वैश्विक द्रव्याचा लहानात लहान भाग होय असे आज मानले जाते. ही रचना जात्याच गत्यात्मक आहे. पूर्वी गृहित धरीत त्या अणूसारखी ती स्थित्यात्मक नाही. म्हणजेच अणू आणि ऊर्जा या शब्दांना स्वतंत्रपणे काहीही अर्थ नाही. हे शब्द एकत्रित विचारात घेतले तरच त्याना जो काही अर्थ आहे तो अर्थ प्राप्त होतो. असे आज मानतात.

मानसिक मॉडेलसुद्धा याच वैज्ञानिक मॉडेलवर बसविता येते. फेअरबेन नावाच्या मनोविश्लेषकाने आपल्या सायको-ॲनलिटिक स्टडीज् ऑफ पर्सनॅलिटी या ग्रंथात असे म्हटले आहे की इगो ही एक मनोवाचक संरचना आहे आणि संरचना असल्याने त्या संरचनेची कार्यशक्तीसुद्धा त्या संरचनेतंच अंतर्भूत आहे. अशा अनेक संरचना मानवी मनात असू शकतात. पण त्यांचे एकूण कार्य पाहून इगो, सुपरइगो अशा प्रकारचा फरक आपण करू शकतो. येथे महत्वाची गोष्ट ही की मनोघटक केवळ जड व अचेतन नसतात. ते गतिमान असतात. त्याना दिशा असते. ( ते डायरेक्शनल असतात. )

युंग यांची विचारसरणी या नवीन मॉडेलला अगदी बरोबर बसते. युंग मानवी सुटया अनुभवातून तयार होणारी मूलचित्रे ( प्रिमॉर्डियल इमेजिस ) व जीवन-प्रसंगांसंबंधित अनुभवांतून तयार होणारी चित्रनाटचे ( आर्किटाइप्स एकएका आल्या जीवनप्रसंगात कसे वागावे हे दाखविणाऱ्या सनातन धाटण्या ) ही दोन्ही मिळून मन तयार होते असे समजतात. म्हणजे मनोघटक या संरचना आहेत अशी मूळातच त्यांची धारणा आहे. मनोघटक या संरचना असल्याने त्याना स्वतःची कार्यशक्ती आहे. फक्त ती कार्यशक्ती उत्तेजित झाली पाहिजे. या सगळया संरचना मिळून जो गठ्ठा तयार होतो त्या गठ्ठयाला युंग सेल्फ असे नाव देतात. सेल्फ म्हणजे मनाच्या ठायी सुप्तपणे असणाऱ्या सगळया मनोवाचक संरचना. या संरचनांची प्रकृती शक्यतांची आहे कारण जर का त्यांच्यायोग्य परिस्थिती असेल तर या शक्यता प्रत्यक्षता बनू शकतात. नाहीतर शेवटपर्यंत तशाच निद्रित राहतात. समजा या सगळया मिळून शंभर शक्यता वा घडण्याच्या शंभर धाटण्या आहेत. तर या शंभर धाटण्या मिळून जी एक संपूर्ण व्यवस्था तयार होईल ती व्यवस्था म्हणजे युंगप्रणीत सेल्फ. परंतु या सुप्त धाटण्यांपैकी एखादी विशिष्ट धाटणी जेव्हा प्रत्यक्षात येते तेव्हा त्या परिपूर्तीलासुद्धा ते सेल्फची परिपूर्ती म्हणतात. या अर्थाने सेल्फ म्हणजे एखाद्या मनुष्याचे अंतिम व्यक्तीकरण; व्यक्ती होणे. गौतमाचा बुद्ध झाला म्हणजेच व्यक्तीकरण झाले. त्याच्या ठिकाणी बुद्धपणाचे जे सेल्फ होते ते सेल्फ खरे झाले.

गौतमाच्या बाबतीत बुद्धपण ही शक्यता होती. शक्यता हा शब्द येथे फार महत्त्वपूर्ण आहे. शक्यता प्रत्येक वेळी प्रत्यक्षता बनेलच असे नाही. परंतु एक

शक्य दिशा म्हणून ती आधीपासून जर नसेल तरीही भागणार नाही. मनुष्य वृद्ध होऊ शकतो. पण पंख पसरून आकाशात उडणारा होऊ शकत नाही. कारण पहिली शक्यता त्याच्या ठिकाणी आहे. दुसरी नाही. शक्यता या फक्त शक्यता असतात. त्या अपरिहार्यता नसतात. मानवी मन ऊर्जायुक्त संरचनांचे बनले आहे असे मानल्याने व्यक्तीकरणाचे प्रमेय वळकट बनते. जड घटक आणि स्वतंत्र ऊर्जा हे प्रमेय स्विकारल्यास मानसिक ताण व त्या ताणाचा निचरा–ताण या प्रकारच्या कायम चक्रात भोवंडत बसावे लागते. मग व्यक्तीकरण अशा शब्दाना फारसा अर्थ नसतो.

"होणे", कोणीतरी होणे, सतत स्वतःच्या पलिकडे जाणे (बिकमिंग) हा मनुष्याचा स्वाभाविक गुणधर्म आहे. घडण्यातून, विकसित होत मनुष्य '**व्यक्ती**' होतो. जन्माला आल्यानंतरचे पहिले काही महिने हे विकसित होणे केवळ शरिरापुरतेच मर्यादित असते. पुढे पुढे त्या विकसित होण्यात मनसुद्धा सामील होते. शरीर वाढते आणि मनही वाढते.

एका दृष्टीने पाहाता विकास, वाढ–बिकमिंग हा सर्व सजीव सृष्टीचाच प्राथमिक गुणधर्म आहे. कोणी स्वतःच्या मनाशी संकल्प करून त्या संकल्पावर-हुकूम स्वतःची वाढ घडवू पाहील, कोणी नशिबावर भरंवसा ठेवून वाढत राहील. मनुष्याच्या बाबतीत या प्रकारच्या प्राथमिक निवडीला महत्त्व आहे. अर्थात कसली निवड न करणे ही देखिल एक प्रकारची निवड आहे असे आपण म्हणत आहोत. निवड पण अकारणात्मक निवड.

अ०वादात मनाची प्रवृत्ती गत्यात्मक आहे असे मानले जाते. मन हे यंत्र नाही. ते स्वभावतः गत्यात्मक आहे. याच्या उलट इतर अनेक शास्त्रे व निम्न-शास्त्रे आणि तत्वज्ञाने मनाला निष्क्रिय–पॅसिव्ह समजतात. एखादा विकट प्रश्न समोर आला म्हणजेच मन क्रियाप्रवण बनते असे नसून विकट प्रश्न सोडविण्यातून उत्तेजक मनाचा जो आनंद मिळतो त्या केवळ आनंदासाठीही मन आपण होऊन असे प्रश्न शोधते अशी अ०वादाची धारणा आहे. मनुष्याचा पिंड Self propelled आहे.

काही वैचारिक दृष्टीकोन मानवी व्यक्तित्वाला निष्क्रिय मानतात. व्यक्तिमत्व भावनांना फक्त प्रतिसाद देण्याचे कार्य करते असे समजतात. त्यांच्या दृष्टीने कोणत्याही आयुष्याच्या बाबतीत बाह्य परिस्थितीला जे महत्व आहे ते त्या माणसाला तितके नाही. बाह्यपरिस्थिती अशी अशी म्हणून ती व्यक्ती तशी. परिस्थिती बदलली तर ती व्यक्तीही बदलली असती. थोडक्यात माझ्या विषयी मी जबाबदार नाही. माझ्या बाहेर जी परिस्थिती आहे ती परिस्थिती जबाबदार. माझ्या आयुष्याच्या सुरुवातीला माझा प्राथमिक संकल्प (सार्त्रच्या भाषेत प्रायमरी चॉईस) चुकला म्हणून माझे आयुष्य असे हे खरे नाही तर मी





ज्या परिस्थितीत जन्मलो आणि वाढलो ती परिस्थितीच चुकीची होती म्हणून मी हा असा असे ही मंडळी म्हणू पाहातात. स्वतःच्या चुकीबद्दल खंत आणि अशीच चूक पुन्हा आपल्या हातून घडू नये म्हणून चिंता वै निश्चिय या गोष्टींना या प्रकारच्या दृष्टीकोनात स्थान असत नाही.

अव्वादी मूल्यव्यवस्थेत स्वतःच्या जबाबदारीला सर्वात अधिक महत्व आहे. म्हणून स्वतःच्या चुकीबद्दलची खंत आणि आत्मपरिवर्तनाचा निश्चय या दोन्ही बाबीनाही तेथे महत्व आहे. मनुष्याचा विकास या दोन प्रवृत्तींमध्ये आहे. या विचारप्रणालीत मोटिव्हेशन्स किंवा मनुष्याची प्रयोजने आधारभूत धरून मनुष्याचा विचार केला जातो. उलट पक्षी मनुष्याला प्रतिसादात्मक यंत्र मानणाऱ्या विचारप्रणालीत मनुष्याच्या ड्राइव्हज् किंवा भूकाना आधारभूत धरून हाच विचार केला जातो – मनुष्य त्याच्या भूकांच्या अंमलाखाली जगतो. या मनुष्याला ' नाही, मी हे घडू देणार नाही ' हे शब्दच उच्चारता येत नाहीत. जणू काही मनुष्याला विरोध करणे, नाही म्हणणे हेच माहित नाही.

मनुष्यप्राण्याला पॅसिव्ह यंत्र मानणाऱ्या दृष्टीकोनांप्रमाणे विचार केल्यास शिकणे म्हणजे कोठल्या बाहय चालनेला कोठला प्रतिसाद द्यायचा याचे धडे गिरविणे. स्वतःला एक प्रकारचे ठाम वळण लावून घेणे; कंडिशन करून घेणे. या प्रबंधाप्रमाणे मनुष्य म्हणज ठराविक चालनाना ठराविक प्रतिसाद व्यक्त करू शकणारी एक व्यवस्था. याच्या नेमकी उलट भूमिका अव्वादाची आहे. अव्वाद मनुष्याला कर्ता मानतो. व म्हणून त्याच्या कृतींचा उगम बाहेरच्या चालनांच्या ठिकाणी न पाहता त्याच्या इच्छाशक्तीच्या ठिकाणी पाहतो.

घटनाशास्त्राचा विचार करताना आपण हे पाहिलेच की मानवी जाणीव फक्त कशा ना कशाची तरीच असू शकते. असे असणे हीच जाणीवेची मूलभूत प्रवृत्ती आहे. मानवी मन सतत जगाच्या व्यवहारात भाग घेत असते. जगाची किंमत ठरवित असते. अनुभवांची प्रतवारी लावीत असते. निवड करीत असते. संकल्प, इच्छा, अपेक्षा करीत असते. निर्णय घेत असते. प्रेम करीत असते. राग करीत असते. समजावून घेत असते. नावडते अनुभव टाळू पाहात असते. आवडते अनुभव परत परत मिळवू पाहात असते. मनाच्या कार्याचे वर्णण करताना आपण वापरलेली सगळी क्रियापदे हेच दाखवितात की मन ॲक्टिव्ह आहे. ते पॅसिव्ह नाही.

मानवी व्यक्तित्व ही काही एखादी पोकळी नव्हे की जी बाहेरून भरून काढता येईल. व्यक्तित्व ही एक चालू प्रक्रिया आहे. विकासवाचक प्रक्रिया. या प्रक्रियेतील काही अंश स्थिर राहातो तर काही बदलतो. कारण प्रत्येक क्षणी आपल्या अनुभवात भरच पडत चाललेली असते. एखाद्याच्या व्यक्तित्वात अंगभूतच जर कसले व्यंग नसेल तर तो स्वाभाविकपणेच प्रौढत्वाकरिता उत्सुक

शक्य दिशा म्हणून ती आधीपासून जर नसेल तरीही भागणार नाही. मनुष्य बुद्ध होऊ शकतो. पण पंख पसरून आकाशात उडणारा होऊ शकत नाही. कारण पहिली शक्यता त्याच्या ठिकाणी आहे. दुसरी नाही. शक्यता या फक्त शक्यता असतात. त्या अपरिहार्यता नसतात. मानवी मन ऊर्जायुक्त संरचनांचे बनले आहे असे मानल्याने व्यक्तीकरणाचे प्रमेय बळकट बनते. जड घटक आणि स्वतंत्र ऊर्जा हे प्रमेय स्विकारल्यास मानसिक ताण व त्या ताणाचा निचरा–ताण या प्रकारच्या कायम चक्रात भोवंडत बसावे लागते. मग व्यक्तीकरण अशा शब्दाना फारसा अर्थ नसतो.

" होणे ", कोणीतरी होणे, सतत स्वतःच्या पलिकडे जाणे ( बिकमिंग ) हा मनुष्याचा स्वाभाविक गुणधर्म आहे. घडण्यातून, विकसित होत मनुष्य 'व्यक्ती' होतो. जन्माला आल्यानंतरचे पहिले काही महिने हे विकसित होणे केवळ शरिरापुरतेच मर्यादित असते. पुढे पुढे त्या विकसित होण्यात मनसुद्धा सामील होते. शरीर वाढते आणि मनही वाढते.

एका दृष्टीने पाहाता विकास, वाढ–बिकमिंग हा सर्व सजीव सृष्टीचाच प्राथमिक गुणधर्म आहे. कोणी स्वतःच्या मनाशी संकल्प करून त्या संकल्पाबर-हुकूम स्वतःची वाढ घडवू पाहील, कोणी नशिबावर भरंवसा ठेवून वाढत राहील. आयुष्याच्या बाबतीत या प्रकारच्या प्राथमिक निवडीला महत्त्व आहे. अर्थात कसली निवड न करण ही देखिल एक प्रकारची निवड आहे असे आपण म्हणत आहोत. निवड पण अकारणात्मक निवड.

अ०वादात मनाची प्रवृत्ती गत्यात्मक आहे असे मानले जाते. मन हे यंत्र नाही. ते स्वभावतः गत्यात्मक आहे. याच्या उलट इतर अनेक शास्त्रे व निम्न-शास्त्रे आणि तत्त्वज्ञाने मनाला निष्क्रिय–पॅसिव्ह समजतात. एखादा बिकट प्रश्न समोर आला म्हणजेच मन क्रियाप्रवण बनते असे नसून बिकट प्रश्न सोडविण्यातून उत्तेजक मनाचा जो आनंद मिळतो त्या केवळ आनंदासाठीही मन आपण होऊन अशी आव्हाने शोधते अशी अ०वादाची धारणा आहे. मनुष्याचा पिंड Self propelled आहे.

काही वैचारीक दृष्टीकोन मानवी व्यक्तित्वाला निष्क्रिय मानतात. व्यक्तित्व चाळनाना फक्त प्रतिसाद देण्याचे कार्य करते असे समजतात . त्यांच्या दृष्टीने कोठल्याही आयुष्याच्या बाबतीत बाह्य परिस्थितीला जे महत्व आहे ते त्या आयुष्याला स्वतःला नाही. बाह्यपरिस्थिती अशी अशी म्हणून ती व्यक्ती तशी. परिस्थिती बदलली तर ती व्यक्तीही बदलली असते. थोडक्यात माझ्या नियतीला मी जबाबदार नाही. माझ्या बाहेर जी परिस्थिती आहे ती परिस्थिती जबाबदार. माझ्या आयुष्याच्या संबंधातला माझा प्राथमिक संकल्प ( सार्त्रच्या मातेत प्रायमरी चॉइस ) चुकला म्हणून माझे आयुष्य असे हे खरे नाही तर मी

ज्या परिस्थितीत जन्मलो आणि वाढलो ती परिस्थितीच चुकीची होती म्हणून मी हा असा असे ही मंडळी म्हणू पाहातात. स्वतःच्या चुकीवद्दल खंत आणि अशीच चूक पुन्हा आपल्या हातून घडू नये म्हणून चिंता वै निश्चिय या गोष्टीना या प्रकारच्या दृष्टीकोनात स्थान असत नाही.

अव्वादी मूल्यव्यवस्थेत स्वतःच्या जबाबदारीला सर्वात अधिक महत्व आहे. म्हणून स्वतःच्या चुकीवद्दलची खंत आणि आत्मपरिवर्तनाचा निश्चय या दोन्ही बाबीनाही तेथे महत्व आहे. मनुष्याचा विकास या दोन प्रवृत्तींमध्ये आहे. या विचारप्रणालीत मोटिव्हेशन्स किंवा मनुष्याची प्रयोजने आधारभूत धरून मनुष्याचा विचार केला जातो. उलट पक्षी मनुष्याला प्रतिसादात्मक यंत्र मानणाऱ्या विचारप्रणालीत मनुष्याच्या ड्राइव्हज् किंवा भूकाना आधारभूत धरून हाच विचार केला जातो—मनुष्य त्याच्या भूकांच्या अंमलाखाली जगतो. या मनुष्याला 'नाही, मी हे घडू देणार नाही' हे शब्दच उच्चारता येत नाहीत. जणू काही मनुष्याला विरोध करणे, नाही म्हणणे हेच माहित नाही.

मनुष्यप्राण्याला पॅसिव्ह यंत्र मानणाऱ्या दृष्टीकोनांप्रमाणे विचार केल्यास शिकणे म्हणजे कोठल्या बाह्य चालनेला कोठला प्रतिसाद द्यायचा याचे धडे गिरविणे. स्वतःला एक प्रकारचे ठाम वळण लावून घेणे; कंडिशन करून घेणे. या प्रबंधाप्रमाणे मनुष्य म्हणज ठराविक चालनाना ठराविक प्रतिसाद व्यक्त करू शकणारी एक व्यवस्था. याच्या नेमकी उलट भूमिका अव्वादाची आहे. अव्वाद मनुष्याला कर्ता मानतो. व म्हणून त्याच्या कृतींचा उगम बाहेरच्या चालनांच्या ठिकाणी न पाहता त्याच्या इच्छाशक्तीच्या ठिकाणी पाहतो.

घटनाशास्त्राचा विचार करताना आपण हे पाहिलेच की मानवी जाणीव फक्त कशा ना कशाची तरीच असू शकते. असे असणे हीच जाणीवेची मूलभूत प्रवृत्ती आहे. मानवी मन सतत जगाच्या व्यवहारात भाग घेत असते. जगाची किंमत ठरवित असते. अनुभवांची प्रतवारी लावीत असते. निवड करीत असते. संकल्प, इच्छा, अपेक्षा करीत असते. निर्णय घेत असते. प्रेम करीत असते. राग करीत असते. समजावून घेत असते. नावडते अनुभव टाळू पाहात असते. आवडते अनुभव परत परत मिळवू पाहात असते. मनाच्या कार्याचे वर्णण करताना आपण वापरलेली सगळी क्रियापदे हेच दाखवितात की मन अॅक्टिव्ह आहे. ते पॅसिव्ह नाही.

मानवी व्यक्तित्व ही काही एखादी पोकळी नव्हे की जी बाहेरून भरून काढता येईल. व्यक्तित्व ही एक चालू प्रक्रिया आहे. विकासवाचक प्रक्रिया. या प्रक्रियेतील काही अंश स्थिर राहातो तर काही बदलतो. कारण प्रत्येक क्षणी आपल्या अनुभवात भरच पडत चाललेली असते. एखाद्याच्या व्यक्तित्वात अंगभूतच जर कसले व्यंग नसेल तर तो स्वाभाविकपणेच प्रौढत्वाकरिता उत्सुक

शक्य दिशा म्हणून ती आधीपासून जर नसेल तरीही भागणार नाही. मनुष्य बद्ध होऊ शकतो. पण पंख पसरुन आकाशात उडणारा होऊ शकत नाही. कारण पहिली शक्यता त्याच्या ठिकाणी आहे. दुसरी नाही. शक्यता या फक्त शक्यता असतात. त्या अपरिहार्यता नसतात. मानवी मन ऊर्जायुक्त संरचनांचे बनले आहे असे मानल्याने व्यक्तीकरणाचे प्रमेय बळकट बनते. जड घटक आणि स्वतंत्र ऊर्जा हे प्रमेय स्विकारल्यास मानसिक ताण व त्या ताणाचा निचरा–ताण या प्रकारच्या कायम चक्रात भोवंडत बसावे लागते. मग व्यक्तीकरण अशा शब्दाना फारसा अर्थ नसतो.

"**होणे**", कोणीतरी होणे, सतत स्वतःच्या पलिकडे जाणे ( बिकमिंग ) हा मनुष्याचा स्वाभाविक गुणधर्म आहे. घडण्यातून, विकसित होत मनुष्य '**व्यक्ती**' होतो. जन्माला आल्यानंतरचे पहिले काही महिने हे विकसित होणे केवळ शरिरापुरतेच मर्यादित असते. पुढे पुढे त्या विकसित होण्यात मनसुद्धा सामील होते. शरीर वाढते आणि मनही वाढते.

एका दृष्टीने पाहाता विकास, वाढ–बिकमिंग हा सर्व सजीव सृष्टीचाच प्राथमिक गुणधर्म आहे. कोणी स्वतःच्या मनाशी संकल्प करून त्या संकल्पावर-हुकूम स्वतःची वाढ घडवू पाहील, कोणी नशिबावर भरंवसा ठेवून वाढत राहील. आयुष्याच्या बाबतीत या प्रकारच्या प्राथमिक निवडीला महत्त्व आहे. अर्थात कसलीही निवड न करणं ही देखिल एक प्रकारची निवड आहे असे आपण म्हणत आहोत. निवड पण अकारणात्मक निवड.

अ०वादात मनाची प्रवृत्ती गत्यात्मक आहे असे मानले जाते. मन हे यंत्र नाही. ते स्वभावतः गत्यात्मक आहे. याच्या उलट इतर अनेक शास्त्रे व निम्न-शास्त्रे आणि तत्त्वज्ञाने मनाला निष्क्रिय–पॅसिव्ह समजतात. एखादा बिकट प्रश्न समोर आला म्हणजेच मन क्रियाप्रवण बनते असे नसून बिकट प्रश्न सोडविण्यातून उत्तेजक मनाचा जो आनंद मिळतो त्या केवळ आनंदासाठीही मन आपण होऊन असे प्रश्न शोधते अशी अ०वादाची धारणा आहे. मनुष्याचा पिंड Self propelled आहे.

काही वैचारीक दृष्टीकोन मानवी व्यक्तित्वाला निष्क्रिय मानतात. [illegible] संवेदनांना फक्त प्रतिसाद देण्याचे कार्य करते असे समजतात . त्यांच्या दृष्टीने कोणत्याही आयुष्याच्या बाबतीत बाह्य परिस्थितीला जे महत्व आहे ते त्या माणसाला स्वतःला नाही. बाह्यपरिस्थिती अशी अशी म्हणून ती व्यक्ती तशी. परिस्थिती बदलली तर ती व्यक्तीही बदलली असते. थोडक्यात माझ्या जिवनाला मी जबाबदार नाही. माझ्या बाहेर जी परिस्थिती आहे ती परिस्थिती जबाबदार. माझ्या आयुष्याच्या संदर्भातला माझा प्राथमिक संकल्प ( सार्त्रच्या [illegible] ) चुकला म्हणून माझे आयुष्य असे हे खरे नाही तर मी





ज्या परिस्थितीत जन्मलो आणि वाढलो ती परिस्थितीच चुकीची होती म्हणून मी हा असा असे ही मंडळी म्हणू पाहातात. स्वतःच्या चुकीवद्दल खंत आणि अशीच चूक पुन्हा आपल्या हातून घडू नये म्हणून चिंता वै निश्चिय या गोष्टीना या प्रकारच्या दृष्टीकोनात स्थान असत नाही.

अव्वादी मूल्यव्यवस्थेत स्वतःच्या जवाबदारीला सर्वात अधिक महत्व आहे. म्हणून स्वतःच्या चुकीबद्दलची खंत आणि आत्मपरिवर्तनाचा निश्चय या दोन्ही बाबीनाही तेथे महत्व आहे. मनुष्याचा विकास या दोन प्रवृत्तींमध्ये आहे. या विचारप्रणालीत मोटिव्हेशन्स किंवा मनुष्याची प्रयोजने आधारभूत धरून मनुष्याचा विचार केला जातो. उलट पक्षी मनुष्याला प्रतिसादात्मक यंत्र मानणाऱ्या विचारप्रणालीत मनुष्याच्या ड्राइव्हज् किंवा भूकाना आधारभूत धरून हाच विचार केला जातो—मनुष्य त्याच्या भूकांच्या अंमलाखाली जगतो. या मनुष्याला ‘ नाही, मी हे घडू देणार नाही ’ हे शब्दच उच्चारता येत नाहीत. जणू काही मनुष्याला विरोध करणे, नाही म्हणणे हेच माहित नाही.

मनुष्यप्राण्याला पॅसिव्ह यंत्र मानणाऱ्या दृष्टीकोनांप्रमाणे विचार केल्यास शिकणे म्हणजे कोठल्या बाह्य चालनेला कोठला प्रतिसाद द्यायचा याचे धडे गिरविणे. स्वतःला एक प्रकारचे ठाम वळण लावून घेणे; कंडिशन करून घेणे. या प्रबंधाप्रमाणे मनुष्य म्हणज ठराविक चालनाना ठराविक प्रतिसाद व्यक्त करू शकणारी एक व्यवस्था. याच्या नेमकी उलट भूमिका अव्वादाची आहे. अव्वाद मनुष्याला कर्ता मानतो. व म्हणून त्याच्या कृतींचा उगम बाहेरच्या चालनांच्या ठिकाणी न पाहता त्याच्या इच्छाशक्तीच्या ठिकाणी पाहतो.

घटनाशास्त्राचा विचार करताना आपण हे पाहिलेच की मानवी जाणीव फक्त कशा ना कशाची तरीच असू शकते. असे असणे हीच जाणीवेची मूलभूत प्रवृत्ती आहे. मानवी मन सतत जगाच्या व्यवहारात भाग घेत असते. जगाची किंमत ठरवित असते. अनुभवांची प्रतवारी लावीत असते. निवड करीत असते. संकल्प, इच्छा, अपेक्षा करीत असते. निर्णय घेत असते. प्रेम करीत असते. राग करीत असते. समजावून घेत असते. नावडते अनुभव टाळू पाहात असते. आवडते अनुभव परत परत मिळवू पाहात असते. मनाच्या कार्याचे वर्णण करताना आपण वापरलेली सगळी क्रियापदे हेच दाखवितात की मन ॲक्टिव्ह आहे. ते पॅसिव्ह नाही.

मानवी व्यक्तित्व ही काही एखादी पोकळी नव्हे की जी बाहेरून भरून काढता येईल. व्यक्तित्व ही एक चालू प्रक्रिया आहे. विकासवाचक प्रक्रिया. या प्रक्रियेतील काही अंश स्थिर राहातो तर काही वदलतो. कारण प्रत्येक क्षणी आपल्या अनुभवात भरच पडत चाललेली असते. एखाद्याच्या व्यक्तित्वात अंगभूतच जर कसले व्यंग नसेल तर तो स्वाभाविकपणेच प्रौढत्वाकरिता उत्सुक

राहील. व प्रौढ बनत:बनता इष्टानिष्टाच्या स्वत च्या कल्पना तयार करील. वेगळया 'स्व'साठी धडपडेल. प्रत्येक आयुष्याच्या ठिकाणी स्वाभाविकपणेच स्वत:सारखे बनावे अर्थात—कोणीतरी व्हावे अशी प्रवृत्ती वसत असते. यालाच युंग इंडिव्हिज्युएशनची प्रवृत्ती म्हणतात.

इंडिव्हिज्युएन म्हणजे इंडिव्हिज्युल बनणे. व्यक्ती बनणे. स्वत:च्या वेगळेपणाने इतरांपासून उठून दिसणे. व्यक्तीकरण हा प्रत्येक मानवी आयुष्याचा स्वभावधर्मच आहे. व्यक्तित्वविकासाच्या शर्यतीतील एक एक अडचण पार करून व्यक्तिविकासाचा शेवटचा टप्पा आत्मसात करणे. मात्र व्यक्तिकरण हा शब्द उच्चारताना सोपा असला तरी प्रत्यक्षात आणताना तेवढाच कठीण आहे. कारण असे की मनुष्य एकटाच्या एकटा वाढत नाही. तो त्याच्याचसारख्या इतर अगणित मनुष्यांच्या संगतीत वाढतो. नैसर्गिक वस्तूंच्या संगतीत वाढतो. त्याच्याही आधी जे होऊन गेले अशा लोकांनीं निर्माण केलेल्या वस्तूंच्या व संस्थांच्या संगतीत वाढतो. म्हणजेच त्याच्या चारी बाजूंनी त्याच्यावर दडपण येते. व या दडपणातून त्याला वाट काढावी लागते. स्वत:चे भागधेय शोधून काढावे लागते. स्वत:चे व्यक्तित्व मिळवावे लागते.

इंडिव्हिज्युएशन आणि बिकमिंग हा जरी मानवी जीवनाचा सर्वसाधारण कायदा असला तरी हे बिकमिंग सहजसुलभपणे घडू शकेल असे नाही. कोठल्याही घडण्याचे टप्पे असतात. कोठलेही घडणे टप्प्याटप्प्याने घडते. ते एकदम एका सुरात घडत नाही. मानवी आयुष्यक्रमात तर हे अपरिहार्यच आहे. कारण मनुष्याची इच्छाशक्ती कोठल्याही एका टप्प्यावर स्थगित बनून तेथल्या तेथे थबकून राहू शकते. म्हणजेच बिकमिंगच्या पहिल्या व नंतरच्या टप्प्यात संघर्ष निर्माण होऊ शकतो. इच्छाशक्ती पहिल्या टप्प्यातून बाहेर पडू इच्छित नाही. आणि पहिला टप्पा पार केल्यावाचून दुसरा टप्पा आत्मसात होणार नसतो. कधी हा पेच सुटतो. इच्छाशक्ती मोकळी होते. पुढील टप्प्यावर पोचते. कधी पेच सुटत नाही. इच्छाशक्ती जागच्या जागी घुटमळत राहते. व्यक्तित्व खुरटते.

जीवन म्हणजे बिकमिंग आणि इंडिव्हिज्युएशन. परंतु हे बिकमिंग घडून येण्यासाठी अनुभव आत्मसात केले जावे लागतात. त्यांचे पचन घडावे लागते. अन्न—हवा—पाण्यावर आपला देह पोसतो. अनुभवावर आपले व्यक्तित्व पोसते. पण अनुभव घेता येण्यासाठी आपले व्यक्तित्व खुले असावे लागते. कारण तरच आपण न भीता अनुभव घेऊ शकतो.

देशोदेशीच्या परिकथात हीच प्रक्रिया कथात्मक पद्धतीने सांगितली गेली आहे. या परिकथांचा बऱ्याच तपशिलवार अभ्यास युंग यांनी केला. त्यावरून त्याना असे दिसून आले की या परिकथात काही एक समान सूत्र आहे. युंग म्हणतात की या सगळया परिकथा मनुष्याच्या आयुष्यक्रमात वेळोवेळी

उद्भवणाऱ्या प्रौढत्वाच्या समस्यांचे दिग्दर्शन करतात. त्या समस्येवरील यशाच्या वा अपयशाच्या एकूण सिच्युएशनचा आराखडा रेखाटतात व त्यांचे स्वरूप सेपरेशन-डेथ-रिबर्थ किंवा फारकत-मृत्यू-पुनर्जन्म या प्रकाराचे आहे.

यातील ही फारकत आईवडिलांपासूनची असते. हे आईवडील जितके प्रत्यक्ष जन्मदाते आहेत तितकेच ते त्या व्यक्तिच्या डोक्यातील त्यांच्या कल्पनेचे आहेत. आणि तितकेच ते आईवडिलांच्या सामूहिक असंज्ञ कल्पनेचे आहेत. प्रत्येक मानवी बालकाला मुख्यतः जर कोणापासून जमवून घ्यायचे असेल तर ते त्याच्या आईवडिलांशी होय. हे जमवून घेताना त्यांच्याशी कशा प्रकारचे वर्तन करावे याचा काही ढोबळ आराखडा ते मूल स्वतःच्या मनाशी तयार करीत असते. असाच आराखडा आजवरच्या यच्चयावत सर्व पिढ्यातील मुलानी तयार केला आहे. या आराखड्याच्या स्मृती म्हणूनच मनुष्याच्या डोक्यात त्याच्या जन्मापासूनच राहात असतात. हे झाले स्मृतीरूपी अवशेष. पूर्वजांच्या अनुभवांवर आधारित. परंतू मूल त्याच्या प्रत्यक्ष अनुभवातूनही काही गोष्टी शिकते. हे झाले त्याचे स्वतःचे अनुभव. म्हणजे एकाच वेळी प्रत्येक व्यक्तीच्या असंज्ञ मनात आईवडिलांची दोन चित्रे वास करीत असतात. एक जन्मदात्या आईवडिलांचे व दुसरे सर्व मानवजातीच्या आईवडिलांचे. म्हणजे जन्मदात्या आईवडिलांच्या चित्राच्या पाठीमागे जगज्जननी आणि जगत्पित्याचे चित्र प्रत्येक मानवी मनात आहे.

प्रौढ होणे म्हणजे आईवडिलांपासून मनाने अलग होणे. त्यांचा प्रेमकोष भेदून बाहेर पडणे. हे अर्थात वयाच्या निरनिराळ्या टप्प्यावर निरनिराळ्या प्रकारे भावेल, व निरनिराळ्या प्रकारे घडून येईल. वयाच्या तिसऱ्या वर्षाची आईवडिलांबरोबरची मानसिक फारकत ही वयाच्या सातव्या किंवा विसाव्या किंवा चाळिसाव्या वर्षीच्या मानसिक फारकतीपेक्षा निश्चित वेगळी असते. दुसरी गोष्ट अशी की ही फारकत केवळ जन्मदात्या आईवडिलाबरोबरची वा आत्मसात केलेल्या त्यांच्या चित्रांबरोबरची नसते. ती त्याच वेळी वैश्विक आईवडिलांच्या चित्रांबरोबरचीही असते.

प्रौढत्वाच्या प्रत्येक वेगळ्या टप्प्यावरचे मानसिक प्रश्न वेगळे असतात. आणि हे प्रश्न वेगळे असल्याने ते वेगवेगळ्या प्रकारे सोडवावे लागतात. हे प्रश्न म्हणजे एक एक जीवनप्रसंग असल्याने ते ते एक नाट्यच असते. जेव्हा जेव्हा मनुष्याच्या आयुष्यात तो तो विशिष्ट जीवन टप्पा उद्भवतो तेव्हा तेव्हा ते ते नाट्य उत्तेजित बनते. आणि त्या त्या मनुष्याला जीवनविषयक मार्गदर्शन करते. अर्थात हे मार्गदर्शन ढोबळ स्वरूपाचे असते हे आपण वर पाहिलेच. दुसरी गोष्ट अशी की फारच थोड्यांच्या आयुष्यात ज्याला आपण समस्यापूर्णता म्हणू अशी समस्यपूर्णता असते. बरीचशी आयुष्ये घोपटमार्गी असतात. व क्वचि-

तच मनावर ताण निर्माण करतात. म्हणून जे आयुष्य समस्यापूर्ण असते तेथच ही नाटचे व्यवस्थित प्रकारे आढळतात. असो.

मनुष्य म्हणजे मनुष्याच्या ठिकाणची उर्जा. मात्र ही ऊर्जा संपूर्णपणे मोकळी नसल्याने ती कोठल्याही पायरीवर स्थगित होऊन राहू शकते. आयुष्यक्रमातले सगळे महत्वाचे टप्पे ओलांडल्यानंतरच मनुष्य खऱ्या प्रौढपणाला पोहोचतो. समजा वयाच्या आठव्या वर्षी मुलाने आईवडिलांच्या प्रेमपाशातून बाहेर येऊन स्वतःचे वेगळे अस्तित्व प्रस्थापित करणे भाग आहे. पण ते मूल तसे करू शकले नाही. तर त्याचा अर्थ त्याची सगळी मानसिक ऊर्जा त्या टप्प्यावर खच्ची होऊन बसेल. या टप्प्यातून बाहेर पडण्यासाठी त्या मुलाला त्याच्या मनात जे आईवडिल घर करून आहेत त्यांच्याशी झगडावे लागेल. झगडून त्या झगडचात यशस्वी व्हावे लागेल. मूल जेव्हा या झगडचात यशस्वी होते तेव्हा त्याचा अर्थ हा असतो की ते या टप्प्याला आता मृत झाले आहे. आणि वरच्या टप्प्यावर त्याचा नवजन्म झाला आहे.

आत्मविकासाच्या प्रत्येक टप्प्यावर मानसिक उर्जा तेथेच कुंठित होऊन राहू शकते. तसाच प्रकारे तो टप्पा ओलांडून पुढील टप्प्यातही प्रवेश करू शकते. म्हणून प्रत्येक टप्पा ओलांडताना फारकत व फारकतीचे दुःख – तो टप्पा म्हणून स्वतःचाच अंत आणि नवीन टप्प्यावरील स्वतःचेच नवजनन या त्रयीतून जावे लागते. फ्रॉईडप्रणीत इडिपस गंडात तारुण्यपदार्पणाच्या टप्प्याच्या वेळच्या मनःस्थितीचे चित्रण आहे. स्वतःच्या वाजवी हक्काने प्रौढ बनण्यासाठी बापाला ठार मारून ( प्रतिकात्मक अर्थाने ) स्वतःच बापाची जागा घेतल्यावाचून इडिपसला गत्यंतर नाही.

मानवी विकासक्रमाचे आपण जर ठळक टप्पे पाडले तर उर्जा यापैकी कोठल्याही टप्प्यावर कुंठित होऊ शकते हे आपण मान्य करू शकू. कारण प्रत्येक टप्प्याची कर्तव्ये वेगळी, आनंद वेगळे म्हणून ओळखही वेगळी असते. वरचा टप्पा गाठायचा म्हणजे मागचा टप्पा व त्या टप्प्यावरचे सगळे आनंद मागे टाकणे. पण हे कठीण वाटते. कारण तोवर तो टप्पा आपल्या अंगवळणी पडलेला असतो. उलट नव्या टप्प्यावर कोठल्या प्रकारच्या अनुभवाना सामोरे जावे लागेल याचीही कल्पना नसते.

प्रौढत्वाचे हे टप्पे कोणी चार मानील, कोणी आठ वा सोळा मानील. टप्प्यांच्या संख्येला महत्त्व नाही. महत्त्व आहे ते हे टप्पे ओलांडताना होणाऱ्या आपल्या मनाच्या अवस्थेला. ही अवस्था नेहमीच अस्वस्थतेची असते. कारण अशा प्रत्येक वेळी अपानतःच मनावर ताण येत असतो. प्रत्येक नव्या टप्प्यावर आपण नवे मीपण, नवे स्वत्व, एक नवी ओळख ( आयडेंटिटी ) स्वतःसाठी जणू आत्मसात करीत असतो. हे घडताना आधीच्या ओळखीची



अनुक्रमणिका



काही मोडतोड होते. तिच्यातला काही भाग गळला जातो. परंतु नव्या अनुभवातून काही नवा भागही तेथे भरीस घातला जातो. एक नवा समन्वय तेथे घडून झालेला असतो. हे सर्व नाटच मनुष्याला चित्रमय स्वरूपात प्रतीत होते. मनुष्याला या प्रत्येक टप्प्यावर आतून जे काही वाटत असते व जे अस्पष्ट असल्याने त्याला अस्वस्थ करीत होते ते स्वतःला स्पष्ट करण्यासाठी जी चित्रे त्याने रचली ती म्हणजे त्याच्या परिकथा व मिथ्स होत. देशकालपरत्वे या परिकथांतले तपशील बदलतील. पण त्यांचा निखळ सांगाडा मात्र सदैव कायमच राहातो.

मनुष्याच्या आयुष्याची एकूण संरचनाच अशी आहे की ते सार्थ होणार असेल तर ते प्रौढच झाले पाहिजे. व्यक्तित्वाचा उत्तरोत्तर होत राहणांरा विकास व प्रौढत्वाचा लाभ हेंच मानवी जीवनाचे खरे श्रेय होय. वाढ, प्रौढत्व हा जीवनाचा एकमेव नैसर्गिक कायदा. मानवी जीवनाच्या रचनेत स्थिती व गती या दोन्ही अवस्था अंतर्भूत आहेत. मनुष्याला देह आहे म्हणून निश्चित प्रारंभ आहे. प्रारंभ असल्याने एक भूतकाळ तो सतत स्वतःबरोबर वागवितो. परंतु त्याचा अंतक्षण उजाडेपर्यंत त्याला एक अज्ञात असा भविष्यकाळही आहे. हा भविष्यकाळ काय हे आज निश्चित झालेले नाही. तो मोकळा आहे. भविष्यकाळ किंवा उद्या म्हणजे शक्यतांचा प्रांत होय. या शक्यता अनंत नसल्या तरी त्या भरपूर आहेत. म्हणजे मनुष्याच्या जीवनाची एक मिती कायम स्वातंत्र्याची आहे. कारण कोठल्याही क्षणी मनुष्य चालू धारणेकडे पाठ फिरवून नव्या धारणेची इच्छा करू शकतो. ही स्वातंत्र्याची मिती मनुष्य कशी राबवतो यावर त्याचे प्रौढत्व ठरते. त्याच्या आयुष्याचे सार्थकत्व ठरते. हे स्वातंत्र्य म्हणजे आव्हानच होय. आणि आव्हानाला पुरे पडणे म्हणजे स्वत्व गाठणे.

क्रमशः —

---

आवेशाच्या आहारी जाताच भले भले मूर्ख बनल्याचे आणि मादांत मर्ख कर्तबगार ठरल्याचे जगात दृष्टोत्पत्तीस येते.



स्तुतीचा परिणाम—स्तुतीमुळे काही जण अधिकच विनम्र बनतात तर आणखी काही अधिकच उद्धट होतात.



अनेक लोक खरेपणाने वागताना दिसतात. मात्र ढोंग करणे त्याना आवडत नाही म्हणून नव्हे तर आपले ढोंग टिकणार नाही, आपण पकडले जाऊ; बोलण्यात नाटक करू शकण्याच्या स्वतःच्या कौशल्यावर निश्चित विश्वास ठेवू न शकल्याने माणसे खोटे वागण्याऐवजी खरे वागत असतात. ⚜



अनुक्रमणिका



## मानवी आक्रमक प्रवृत्ती ( १० ):

### ( अँथनी स्टोर व कॉनराड लॉरेंझ आदींच्या ग्रंथावरून )

माणूस स्वभावतःच आक्रमक असतो. म्हणजेच त्याच्या ठिकाणी जो आक्रमकपणा दिसतो त्याची मुळे त्याच्या शरिर–प्रकृतीत ( Biology ) आहेत. म्हणजेच परत असे की आक्रमकपणा सर्वथा अनावश्यक नसून जीवरक्षणाच्या दृष्टीने माणसाला तो आवश्यक आहे. मानवी जीवनाला कसल्या ना कसल्या प्रकारे तो लाभदायक आहे. मात्र अनेकदा आक्रमकपणातून मानवजातीचा तोटाही झाल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. तेव्हा माणसापुढे आक्रमकपणाच्या बावतीत जो एकमेव प्रश्न आहे तो हा की आक्रमकपणाचे दोष टाळून आक्रमकपणा सामाजिक हितासाठी कशा प्रकारे राबविता येईल ? दुसऱ्या शब्दात, आक्रमकपणाला समाजहितकारक वळण द्यायचे झाल्यास ते कसे देता येईल ? आक्रमकपणाचे उन्नयन कशा प्रकारे घडवून आणता येईल ? येथे अर्थात अशा प्रकारचे उन्नयन शक्य आहे हे आपण गृहीतच धरीत आहोत हे लक्षात ठेवावयास हवे. मानवी राग, द्वेष आदी नकारात्मक भावनांचे उन्नयन माणसाने करावयास पाहिजे असे आपण म्हटले. पण हे शक्य होण्यासाठी आणखी एक गोष्ट माणसाला करावी लागेल- माणसाला स्वतःशी अत्यंत प्रामाणिक बनावे लागेल; स्वतःचे गुणदोष स्वतःशी मान्य करावे लागतील. थोडक्यात, स्वतःची सत्य अवस्था स्वतःशी कबूल करावी लागेल. जर आपण तसे केले नाही तर परत एकदा स्वतःसंबंधीच्या अंधारात आपण राहू आणि जी सुधारणा करण्याची इच्छा आपण करीत आहोत ती आपल्याकडून घडून येणार नाही. प्रथम जर आपण आपले दोष मोकळेपणाने स्वतःशी कबूल केले तरच त्या दोषावर आपण मात करू शकू.

माणूस हा विचारप्रधान प्राणी आहे आणि सर्व गोष्टी तो विचारपूर्वक करतो असे आपण मानतो. वस्तुतः ते खोटे आहे. विचारापेक्षा माणूस विकारवशच अधिक आहे. माणसाचा आजवरचा सर्व इतिहास–त्याच्या त्या आपापसातल्या लढाया, त्या रक्तरंजित क्रांती, ते रक्तपात, जिहाद नि धर्मयुद्धे–एक क्षणभर जरी हा इतिहास नजरेसमोर आणला तरी माणूस विचारी नसून विकारी आहे हे सत्य मनाला पटून जाईल. माणसाच्या विकारवशतेचा हा झाला



अनुक्रमणिका

ऐतिहासिक बाजूचा पुरावा. परंतु उत्क्रांतीशास्त्रही असाच पुरावा देते. उत्क्रांतीशास्त्रदेखिल हेच सांगते की विचाराच्या कितीतरी खूप आधी प्राण्यांच्या ठिकाणी विकारांचा उगम झाला होता. विचार ही अगदी अलिकडची घटना आहे. म्हणावी तितकी ती माणसाच्या अंगात दृढावलेली नाही, म्हणजेच मनावरचा दाब वाढला की माणूस आपल्या मूळच्या वर्तनाकडे—विकारवशतेकडे वळतो. याचाच अर्थ असा की माणसाला जर वाचवायचे असेल तर त्याची विचारशक्ती आपण दृढ बनविली पाहिजे. विचारशक्ती दृढ बनण्यातच मानवजातीचा तरणोपाय आहे.

तथापी काही लोक असे मानतात की माणूस हा स्वभावतःच युद्धप्रिय आहे. युद्धासाठी युद्ध, लढण्यासाठी लढणे त्याला आवडते. माणूस लढण्याच्या आवडीने लढतो, त्याच्या रक्तातच युद्धपिपासूपणा आहे हा सिद्धांत जर आपण खरा मानला तर त्याच्या आक्रमकपणाला वळण लावण्याचा व आक्रमकपणा सांस्कृतिकदृष्ट्या उपयुक्त मार्गाला लावण्यासाठी प्रयत्न करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. परंतु माणूस विचार करू शकतो. आणि विचाराने वागून भांडणे टाळू शकतो हे जर खरे असेल तर विचार करण्याची त्याची शक्ती वाढविण्याचा प्रयत्न आपण करू. कारण विचाराने मानवी आततायीपणावर मात करता येते ही गोष्ट आपणाला मान्य असेल. माणसे आततायीपणाने वागतात आणि हा आततायीपणा टाळता येण्यासारखा आहे ही गोष्ट ध्यानात घेऊन जर आपण स्वतःच्याच मनाचा विचार करू लागलो तर स्वतःच्या स्वभावासंबंधिची आजवर अज्ञात असलेली कितीतरी नवी सत्ये आपल्या एकदम ध्यानात येतील.

दोन राष्ट्रे एकमेकांबरोबर युद्ध पुकारतात. कदाचित युद्धाचा आततायीपणा न करता समंजसपणाने चर्चा करुनही समोरचा प्रश्न ती सोडवू शकली असती. राष्ट्राराष्ट्रांतली स्पर्धा केवळ आर्थिकच नसते हे जर आपण ध्यानात घेतले तर अनेकदा राष्ट्राराष्ट्रातली भांडणे वायफळ कारणांसाठीच असतात हे आपल्या ध्यानात येऊ शकेल. दोन भिन्नपंथी वा भिन्नमतधारकातली भांडणे नेहमीच आततायीपणाची असल्याचे अंतिम विश्लेषणात आढळून येते, कारण या सर्व मंडळींचा जाहीर उद्देश लोकोद्धाराचा असूनही म्हणजेच समान असूनही ती मंडळी हाणामाऱ्या करतात. याला कारण त्यांच्या विचाराची सदोषता. अनेक लोक फक्त एकाच बाजूने विचार करतात. त्यामुळे त्याना फक्त स्वतःची तेवढी बाजू दिसते आणि तेवढीच बाजू दिसत असल्याने तीच तेवढी त्याना खरी वाटते. उत्तम मानवाची फक्त आपलीच तेवढी कल्पना बरोबर किंवा लोकोद्धाराचा फक्त आमचाच तेवढा मार्ग अचूक असे म्हणणाराना त्या म्हणण्यामुळे कितीही जरी आत्मसमाधान मिळत असले तरी त्या आत्मसमाधानामुळे त्यांचे म्हणणे सिद्ध होणार असते असे नव्हे. जगात कितीतरी भिन्नभिन्न प्रकारचे समाज आहेत. आज हजारो वर्षे ते समाज स्वतःचे स्वत्व राखून टिकून आहेत. आणि त्या प्रत्येक समाजात

उत्तम म्हणता येतील अशी श्रेष्ठ दर्जाची माणसेही जन्मत आली आहेत. म्हणजेच त्याच्या भवताली जे मानवी आणि नैसर्गिक जग होते त्या जगाशी उत्तम व उपयुक्त प्रकारे जमवून घेण्यात त्या समाजाना यश आलेले आहे. जर तसे यश त्याना आले नसते तर ते समाज एव्हाना नष्ट झाले असते. ज्या समाजाना म्हणजेच अर्थात त्या समाजाच्या मानवी घटकाना बाहेरील वातावरणाशी जमवून घेता येत नाही ते समाज कालांतराने नष्ट होत असल्याचे आपण पाहातो. सांगायचे तात्पर्य असे की जगभर अशा प्रकारे विविध प्रकारच्या ( Hero–Systems ) नरश्रेष्ठ-आदर्श अस्तित्वात असताना आमचाच तेवढा आदर्श सर्वश्रेष्ठ असून तोच तेवढा जगभर प्रस्थापित झाला पाहिजे असे म्हणणे केवळ मूर्खपणाचेच नसून ते वेडेपणाचेही असते. कारण बाह्यदृष्टया कदाचित मानवाचा एकच आदर्श साचा जगभर लादता येणे शक्य झाले तरी जैविक व मानसिक दृष्टया मानवजातीच्या भावी उन्नतीच्या दृष्टीने कदाचित ते अयोग्यदेखिल ठरेल. कोणी सांगावे आजचा आदर्श मानव उद्याचा बदललेल्या वातावरणात कदाचित जगावयासच नालायक ठरेल. परंतु हा मूलभूत विचारच अनेक लोकांना उमजत नाही. ते फक्त आपल्या स्वतःच्या वैयक्तिक पंथाचा, एकांगी विचारसरणीचा, धर्मपंथाचा, श्रद्धेचा विजय अपेक्षितात आणि इतर पंथांचे, विचारसरणींचे आणि श्रद्धांचे निर्दालन करू इच्छितात. समजा वेगवेगळी मते धारण करणारी ही मंडळी दुसऱ्याच्या मार्गावर आक्रमण न करता स्वतःचाच मार्ग चालत राहिली असती तर काय वाईट होणार होते काय ? बिलकूल नाही ! पण खोटया अहंकाराला बळी पडून परस्परांचा काटा काढण्याच्या फंदात ही माणसे पडतात व शेवटी सर्व जगाचेच नुकसान करून ठेवतात. आपण खरोखर काय करीत आहोत याचे निष्पक्ष-पातीपणाने आपण स्वतःच जर निरिक्षण केले तर आपणालाच आपल्या चुका कळून येऊ लागतात. मग अलेक्झांडर किंवा नेपोलियन अशा मंडळींचे जग जिंकण्याचे व जास्तीत जास्त लवकर जग उन्नत्तीच्या शिखरावर नेण्याचे मनसुबे किती हास्यास्पद होते हे निदर्शनास येऊन आपण स्वतःच स्वतःशी हसू लागतो या प्रकारच्या जगज्जेत्याना असा एक भ्रम झालेला असतो की संपूर्ण पृथ्वी जर एकछत्री अंमलाखाली येऊ शकली ( आणि तीही त्यांच्या स्वतःच्या ) तर हां हां म्हणता अखिल मानव-जातीचा उद्धार होऊ शकेल. कारण उत्तम मानवाचा जो आदर्श आपणाला अभिप्रेत आहे तो आपण एकछत्री अंमलामध्ये मानवजातीवर लादू शकू असे त्याना वाटते. मोठेपणाच्या खोटया गंडाने एकदा का एखादी व्यक्ती पछाडली गेली की शक्याशक्यतेतला भेदच तिला कळेनासा होतो. आणि स्वतःच्या भ्रामक स्वप्नासाठी लक्षावधी निरपराधांच्या जीवावर ती उठते. आणि एवढे करून मानवजात पुढे नेण्याच्या दृष्टीने एक इंचभरही प्रगती त्यानी केलेली नसते हा तर मोठाच दैवदुर्विलास होय. दुर्दैवाची आणि लाजिरवाणी गोष्ट







ही की स्वत:च्या केवळ विकृत लहरीसाठी हे तथाकथित महामानव लाखो गरीब लोकांच्या जीवितवित्ताशी खेळ खेळत असतात आणि नैतिकदृष्टया त्यांचे हे वर्तन गर्ह्यणीय आहे ही गोष्टच सर्वसामान्य मनुष्याच्या ध्यानात येत नाही. कारण सामान्य माणूस अलेक्झांडर आणि नेपोलियनांच्या कृत्याकडे निषेधाऐवजी कौतुकाच्या भावनेने पाहतो. त्यांच्या तथाकथित पराक्रमाच्या नि मोठेपणाच्या मुलाम्याला भुलतो. जे महाभाग लक्षावधींच्या अकारण व दु:खमय मरणाला आणि यातनाना कारणीभूत झाले त्यांची ती निष्ठुरता व इतरांच्या सुखदु:खा-बिषयीची बेफिकीरी आपण केवळ विसरूनच जात नाही तर भरीस पुरुषश्रेष्ठ म्हणून वर्षानुवर्षे त्यांच्या मोठेपणाचे पवाडेही गातो. ( आणि पवाडे गाऊन नंतरच्या पिढीच्या मनात त्यांचा आदर्शही रुजवितो. ) वास्तविक ' महामानव, पुरुषश्रेष्ठ ' या प्रकारच्या मानवंदना आपण या मंडळींना देण्याचे अजिबात कारणच नाही. कारण अंतिम दृष्टीने पाहाता ते मानवजातीचे मित्र नसून मानवजातीचे शत्रू असतात. मानवजातीवर अत्याचार करणारानाही आपण थोर समजतो याचे कारण कदाचित हे असावे की सत्ता ( विशेषत: राजकीय सत्ता ) व ती सत्ता संपादन करणारे यांच्याविषयी आपल्या मनात मुलत:च एक भीतीयुक्त आदरभावना वसत असावी. न पेक्षा मानवजातीचे अगणित नुकसान करणाऱ्या अशा प्रकारच्या लोकांबद्दल आपणास प्रेम का बरे वाटावे ? या बाबतीत आपले तर्कशास्त्र कदाचित असे असावे की ज्या अर्थी लक्षावधी लोकांच्या जीवितवित्तावर हे लोक सत्ता गाजवित होते त्या अर्थी जन्मत:च त्यांच्या अंगी काही थोर गुण असले पाहिजेत. या लोकांच्या तथाकथित मोठेपणाचा एवढा प्रचंड प्रभाव आपल्या मनावर आहे की त्यांच्या व्यक्तित्वाचा नि:पक्षपाती विचारच आपले मन करू शकत नाही. दुसरे असे की अलेक्झांडर किंवा नेपोलियन आदींच्या युद्धनेतृत्वा-विषयी इतक्या अगणित प्रकारे व अगणित बाजूनी आपण ऐकलेले असते की त्यानी केलेल्या युद्धातली भयानकताच आपल्या मनाला जाणवेनाशी झालेली असते. युद्धातली प्राणहानी, यातना यांचे चित्रच त्यांच्या बाबतीत आपण आपल्या डोळ्यासमोर आणू शकत नाही. सर्व प्रकारच्या युद्धाविषयी आपण एक वस्तुस्थिती ध्यानात ठेवावयास हवी. ती ही की युद्ध केवळ दोन्ही बाजूची नेतेमंडळी खेळत नाहीत. युद्धात विजयी आणि पराभूत अशा दोन्ही बाजूकडील लक्षावधी माणसे सामील असतात. म्हणून जेवढ्या प्रमाणात व अर्थाने युद्धाला सुरवात करणारे आपले नेते भ्रमिष्ट आणि वेडे असतात तेवढ्याच प्रमाणात आणि अर्थाने त्या युद्धात प्रत्यक्ष सामील होणारे तुम्ही आम्हीही भ्रमिष्ट नि वेडे असतो. नैतिकदृष्टया जबाबदार असतो. इतिहासाकडून एक महत्वाची गोष्ट जर शिकण्यासारखी असेल तर ती ही की झुंडीच्या वागणूका या नेहमीच सामाजिकदृष्टया अनर्थकारक असतात. झुंडीच्या हालचाली वेडेपणाच्याच नव्हे तर एकूण मानवी हिताच्या दृष्टीने अपायकारकही असतात हे न विसरण्यातच आपणा सर्वांचे हित आहे.

•

झुंडीत सामील झाला की माणूस किती मूढ बनतो हे तर विसाव्या शतकात आपण वरचेवर पाहात आहोत. परंतु असे का घडते याचा खोलवर जाऊन विचार मात्र आपण केलेला नाही. एकटा असताना जो माणूस शहाण्यासारखा वागतो तोच झुंडीत सामील होताच एकदम इतका अडाणी कसा बनतो ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. चांगली शिकलीसवरलेली, वयस्क माणसेही झुंडीत सामील होताच स्वतःचे वय आणि शिक्षण विसरून वाटेल ते भयंकर कृत्य करावयास तयार होताना पाहून आश्चर्याने मन थक्क होते. हेगेल म्हणत असे की "इतिहास आणि गत अनुभवातून आपण माणसे आणि राष्ट्रीय सरकारे काहीच शिकत नाही." ते अशा वेळी शंभर टक्के पटू लागते. हेगेल आणखी असेही म्हणत असे की राष्ट्रे काय किंवा व्यक्ती काय इतिहासाच्या निष्कर्षावर कोणीही आपले वर्तन बेतीत नाही हेही तितकेच खरे आहे. त्याच त्याच चुका परत परत मानवजात करताना आढळते हे नाहीतर कशाचे बरे द्योतक आहे ?

माणसाच्या एकूण आयुष्यक्रमाचे निरिक्षण जर आपण केले तर आपल्या असे ध्यानात येते की माणूस हा अत्यंत आत्मविसंगतीपूर्ण आणि अत्यंत धरसोडीने वागणारा प्राणी आहे. विचाराने वागणारा भूतलावरचा एकमेव शहाणा प्राणी म्हणून मोठ्या अपेक्षेने त्याच्याकडे पाहू जावे तर नेमके त्याच वेळी अत्यंत वेडेपणाने वागताना तो आपल्या नजरेस पडतो. मानवी स्वभावाचे हे कोडे तरी काय आहे ? हे कोडे उलगडण्यासाठी मानवी व्यक्तित्वाचे विश्लेषण करावे लागेल. मानवी व्यक्तित्व द्विविध आहे. त्यातील काही भाग सांस्कृतिक परंपरांनी घडविलेला असतो तर दुसरा उपजत आलेला असतो. पहिल्या भागावर चिकित्सक विचारशक्तीचा अधिकार चालतो. पण दुसऱ्यावर हा अधिकार चालत नाही. उत्क्रांतीक्रमात आजचा मनुष्य जेव्हा मनुष्यत्वात परिणत होत होता तेव्हा जी अगणित स्वाभाविक वळणे मनुष्याने आत्मसात केली त्यातून त्याच्या स्वभावाचा हा दुसरा भाग बनला आहे. याच स्वभावाला आपण उपजत स्वभाव म्हणतो. हा स्वभाव चालना आणि त्या चालनाला द्यावयाचे प्रतिसाद अशा स्वरूपाचा असतो. अशा प्रकारच्या चालना प्रतिसादांच्या अगणित साखळ्या आपल्या स्वभावात आहेत आणि त्या यंत्रवत कार्य करतात. या स्वभावावर चिकित्सक बुद्धीचा इलाज चालत नाही. आपण ज्याला आमचा सामाजिक स्वभाव म्हणतो तो सामाजिक स्वभाव उत्क्रांतेतिहासात फार उशीरा तयार झाला आहे. प्रारंभी माणूस आणि पशू यात फारसा फरक नव्हता. फरक असला तर तो इतकाच असेल की अनेक हिंस्त्र जातीचे प्राणी एकटे फिरत असत तर माणूस कळप करून फिरत असे. असा कळप करून फिरणे त्याला अर्थात अपरिहार्यच होते. कारण तो जर कळप करून फिरला नसता तर हिंस्त्र श्वापदाच्या तोंडी पडून पोट भरण्यासाठी शिकार न मिळाल्याने केव्हाच तो नष्ट होऊन गेला असता. इतर प्राण्यांपाशी तीक्ष्ण नख्या, जबरदस्त वेग,



अनुक्रमणिका

उत्तम शारिरीक बळ अशी आत्मरक्षणाची व अन्न मिळविण्याची स्वाभाविक साधने आहेत तशी स्वाभाविक साधने मनुष्यप्राण्यापाशी नाहीत. तेव्हा आत्मरक्षणासाठी आणि खाद्य मिळविण्यासाठी मनुष्यप्राण्याला एकमेकांच्या सहकार्यावरच अवलंबून रहावे लागणार होते. कळप करून राहिल्याने मनुष्यप्राण्यामध्ये सामाजिक स्वभाव तयार झाला. परंतु मनुष्याची उत्पत्ती पशुवर्गातून झाली असल्याने पशुवर्गाचे अनेक स्वभावविशेष मनुष्यप्राण्याच्या ठिकाणी तसेच राहून गेले आहेत. मनुष्यप्राण्याच्या सामाजिक स्वभाववैशिष्ठ्यामागची ही पशुस्वभावाची स्वाभाविक बैठक ध्यानात घेतली की मनुष्यप्राणी कधी अत्यंत सुसंस्कृतपणे तर कधी अत्यंत रानटीपणे का वागतो याचे उत्तर मिळू शकते. मनुष्यप्राण्याच्या सामाजिक स्वभावाच्या आत जी पशु स्वभावाची बैठक आहे त्या बैठकीचे कायदे कोणते असावेत याचा बराचसा अचूक अंदाज आपण करू शकतो. गेली कित्येक वर्षे जीवशास्त्रज्ञ प्राण्याच्या आचारशास्त्राचा बारकाईने मागोवा घेत आहेत. या अभ्यासात त्याना असे आढळून आले की काही पशुआदी प्राणी आणि मनुष्यप्राणी यांच्यात विशिष्ट वर्तनाच्या बाबतीत बरेचसे साम्य आहे उदा.समान कळपातले उंदिर समान कळपातल्या माणसांप्रमाणेच कळपकऱ्यांशी मित्रत्वाने आणि कळपाबाहेरच्यांशी शत्रुत्वाने वागतात. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर स्वतःच्या कळपात ते समाजशील असतात तर कळपाबाहेर क्रूर व रानटी असतात. उंदिर वासावरून एकमेकाला ओळखतात. समान कळपातल्या उंदरांचा वास सारखा असतो त्यामुळे कळपाबाहेरच्या उंदराला ते तत्काळ ओळखू शकतात. ओळखल्यावर त्याच्या अंगावर तुटून पडून त्याचा फडशा पाडतात. मनुष्ये एकमेकांना भाषेवरून, धर्मावरून, श्रद्धेवरून, विचारसरणीवरून ओळखतात. पण एरवी मनुष्यांचे वर्तनही कळपकरी उंदराप्रमाणेच नसते काय? आपल्या कळपातल्या लोकांशी मनुष्ये साधारणतः गोडीगुलाबीने वागतात पण बाहेरच्यांशी तितक्याच फटकळपणे ती वागत नाहीत काय? कळपाबाहेरच्यांच्या सद्हेतूंचा त्याना संशय असतो. त्यांचे त्यांना भय वाटते. उंदिर जसे भिन्न भिन्न कळपात विभागलेले असतात तशाच प्रकारे माणसेही निरनिराळ्या धार्मिक वा राजकिय पंथात विभागलेली असतात मात्र उंदिर आणि मनुष्य या दोघात एक मूलभूत फरक आहे. उंदरांची संख्या निसर्गाच्या नियंत्रणाखाली असते. माणसाला हे नियंत्रण लागू नाही. उंदरांची संख्या एका विवक्षित मर्यादेपर्यंत पोचली आणि खाण्याच्या पदार्थांचा तुटवडा भासू लागला की त्यांचे प्रजननच खुंटते. मनुष्याच्या बाबतीत असे काहीही घडत नाही. जननसंख्या मर्यादित ठेवील अशी कोठलिही शारिरीक सोय मनुष्याच्या शरिरात नाही. किती उंदिर म्हणजे लोकसंख्या-प्रस्फोट हे जसे उंदराना उपजतपणे समजते तसे माणसाना समजत नाही. उंदिर व मनुष्ये या दोघातला दुसरा फरक असा की उद्या उंदरांची आपापसात कितीही मोठी लढाई घडून आली तरी

उंदरांचा वंश चालविण्यापुरते थोडे उंदिर ते जगू देतील. मनुष्ये वंशसंहार करतील. मनुष्याने जी भयानक आणि सर्वशक्तिमान संहारक अस्त्रे शोधून काढली आहेत त्या अस्त्रांच्या तडाख्यातून एकतरी मानवी जीव वाचेल की नाही याची शंकाच आहे !

मनुष्याचे सगळयात मोठे वैशिष्ठ्य हे की त्याच्यापाशी भाषा आहे. त्याला शब्दोच्चार करता येतात, त्याला खुणात लिहिता येते, संकल्पना तयार करता येतात, त्या संकल्पनांच्या मदतीने विचार बनविता येतात, विचार लिहिता येतात, लेखनकलेच्या मदतीने एका पिढीचे विचार दुसऱ्या पिढीला सांगता येतात. किंवा त्यानंतरच्या पिढयांसाठीही राखून ठेवता येतात. भाषा आणि लेखनकलेच्या जोरावर भूतलावरील यच्चयावत इतर सर्व प्राण्याना मनुष्याने कितीतरी मागे टाकले आहे. परंतु याच विशेषामुळे त्याचे नष्टचर्यही ओढवू घातले आहे. कारण ज्या भाषेमुळे आणि लेखनकलेमुळे माणूस माणसाच्या जवळ येतो. त्याच विशेषांमुळे माणूस माणसापासून दूरही जात आहे. कारण सामंजस्या-ऐवजी गैरसमज आणि मित्रत्वाऐवजी शत्रुत्वही भाषेमुळे पसरू शकते. अर्नोल्ड गेहलेन नावाच्या एक विचारवंताने मनुष्याच्या भविष्यासंबंधी असे उद्‌गार काढले आहेत की " मनुष्य त्याने स्वतःच निर्माण केलेल्या जाळयात सापडला आहे ! "

प्राणीमात्रापैकी फक्त मनुष्यच काय तो स्वतः संपादन केलेले ज्ञान पुढील पिढयांसाठी राखून ठेवू शकतो. मनुष्यापाशी भाषा आहे आणि लेखनाची कला आहे. त्यांच्या मदतीने तो आपले ज्ञान मागे ठेवू शकतो. पुढील पिढया ते आत्म-सात करून स्वतःच्या प्रयत्नाने त्याच्यात भर घालू शकतात. मनुष्याव्यतिरिक्त आणखी कोठल्याच प्राण्यापाशी शब्द, भाषा व संकल्पनांचे तंत्र नाही. त्यामुळे स्वतःचे ज्ञान. त्याना स्वतःबरोबरच घेऊन जावे लागते. स्वसंपादित ज्ञान विचार आणि शाब्दिक कल्पनांच्या साहाय्याने पुढील पिढयांसाठी राखून ठेवता येण्याची किमया ज्या दिवशी मनुष्यप्राण्याला गवसली त्या दिवसापासून त्याच्या उत्क्रांती-क्रमाचे सगळे चित्रच पालटून गेले. बाह्य वातावरणाच्या नि जगाच्या अपरिहार्य दडपणापासून त्या दिवशी जणू तो प्रथमच मुक्त झाला ! मनुष्यापाशी शब्द आणि कल्पनांचा साथ असल्याने जे जे त्याला माहीत होत होते ते ते तो त्याच्या-बरोबरच्या इतरांना शिकवू शकत होता. त्याला धनुष्यबाणाचा शोध लागला. त्याने तो टोळीतल्या इतर लोकांना शिकविला. एवढेच नव्हे तर तो शोध त्याच्या स्वतःच्या नि त्याच्या इतर सहकाऱ्यांच्या नातवंडापतवंडानाही मिळाला. धनुष्याचा शोध म्हणजे माणसाच्या शरीराला जोडला गेलेला नवा अवयवच ! असे अनेक नव अवयव माणूस त्याच्या शरीराला जोडीत होता. शरीरशास्त्र असे सांगते की,

जोवर एखादा शरिरावय व जीवनाशी जमवून घताना उपयुक्त ठरतो तोवर शरिर तो अवयव प्रयत्नपूर्वक सांभाळते. धनुष्यबाणाच्या नव्याशोधाची गत तीच झाली. मनुष्य ही हत्यारे टाकून देऊ इच्छित नव्हता. ही हत्यारे ही त्याच्या शरिराचाच एक अविभाज्य भाग बनला. प्राणी आणि बाह्य नैसर्गिक वातावरण या दोहोत एक स्वाभाविक समायोजन आढळते. वातावरण बदलताच त्या वातावरणाशी सुसंगत असे बदल प्राण्याच्या शरिरात व मनात घडू लागतात. ह्या बदलांची गती अर्थातच फार मंद असते. प्राणी वनस्पतींचा उत्क्रांतीसिद्ध इतिहास तो हाच. मनुष्य वगळता इतर सगळ्या जीवमात्रांची उत्क्रांती फारच हळूहळू घडून येते. मनुष्यापाशी भाषा आणि शब्द असल्यामुळे त्याला निसर्गाबरोबर राहाण्याची गरज भासत नाही. बाहेरच्या वातावरणात जे जे बदल घडून येतात त्या बदलांना मिळतेजुळते बदल एकदोन पिढ्यांच्या अवधीत माणूस स्वप्रयत्नानेच साध्य करू शकतो या घटनेचे काही फायदे आहेत तसेच तोटेही आहेत. सर्वांत मोठा तोटा हा की ज्या वेगाने मनुष्याची भौतिक प्रगती घडून येत असते त्या वेगाशी तोल राखील अशी शारिरीक व मानसिक प्रगती त्याला घडवून आणता येत नाही. आता हेच पाहाना! माणसाने प्रचंड भौतिक प्रगती आज साध्य केली आहे. पण त्या भौतिक प्रगतीत जे दोष व उणीवा आहेत, ज्या गफलती आहेत त्याना पुरे पडू शकेल असे शरीर व मन तो तयार करू शकलेला नाही. म्हणजे त्याच्या प्रगतीत जे धोके लपलेले आहेत त्यांच्याशी मुकाबला करू शकणाऱ्या शारिरीक मानसिक क्लृप्त्या त्याच्यापाशी नाहीत. म्हणजेच इतर प्राण्याना जसे स्वाभाविक संरक्षण असते तसे स्वाभाविक संरक्षण त्याच्यापाशी नाही. इतर प्राण्यांची वाटचाल नैसर्गिक वातावरणाच्या वाटचालीशी संधान राखून असते. माणूस कृत्रिम साधनांची मदत घेऊन फारच वेगाने पुढे जात असतो. जीवनसंग्रामात स्वतःचा जीव वाचविता यावा आणि स्वतःचे भरणपोषणही करता यावे म्हणून वाघसिंहादी प्राण्याना निसर्गतःच तीक्ष्ण नख्या व बळकट पंजे गवसले. पण या नख्या आणि पंजांपायी आपापसात लढल्याने त्यांची सगळी जातच नाहिशी होऊ नये म्हणून आपापसात लढताना किती मर्यादेपर्यंत या स्वाभाविक शस्त्रांचा वापर त्यानी करायचा याचा एक आलेखित संकेतही त्याच वेळी त्यांच्या मनावर बिंबत गेला. होता हे प्राणी आजही जेव्हा आपापसात लढतात तेव्हा प्रतिस्पर्धी लढाईत कायमचा जायबंदी होणार नाही वा ठार होणार नाही याची काळजी घेऊन ते लढतात. आपापसातील लढाईत जीवघेणा क्रूरपणा दाखविता कामा नये असा एक स्वाभाविक सांकेतिक निर्बंध मूलभूतरित्या त्यांच्या ठिकाणी उत्क्रमित होऊन राहिला आहे. म्हणूनच विजयी लांडग्यासमोर पराभूत लांडग्याने स्वतः होऊन स्वतःचा गळा केला तरी लांडगा त्याला जायबंदी करीत नाही. जो संयम वाघसिंहांच्या ठिकाणी आढळतो तो मनुष्याच्या ठिकाणी आढळत नाही. शत्रू शरण आला तरी माणूस त्याचे हालहाल करतो.



अनुक्रमणिका



मनुष्यप्राण्याच्या बाह्य भौतिक वातावरणात जे बदल घडून येत होते त्यांचा वेग मात्र क्रांतिकारकरित्या प्रचंड होता. यातील काही बदल तर माणूस स्वतःच स्वतःच्या यत्नाने घडवून आणित होता. माणसाची मानसिक प्रकृती या बदलांशी जुळते घेऊ शकली नाही. उदा. एकापेक्षा एक वरचढ अशी अनेक संहारक शस्त्रे आणि अस्त्रे मनुष्याने शोधून काढली. पण या शस्त्रास्त्रांशी मेळ ठेविक असा मानसिक संयम मनुष्याच्या मनात तयार झाला नाही. आपला आक्रमकपणा हाताबाहेर जाणार नाही याची स्वाभाविक काळजी पशवादी प्राण्याकडून देखिल घेण्यात येते. पण आपण जी सर्वसंहारक अस्त्रे तयार केली आहेत त्याचा अंतिम परिणाम आपल्या स्वतःच्या व आपल्या एकूण जातीच्या बाबतीत काय घडेल याचा यत्किंचितही विचार माणूस करीत नाही. शस्त्रास्त्रांच्या पैदाशीबरोबरच जर आपल्या नैतिक भावनेतही वाढ झाली नाही तर एकांगी शस्त्रास्त्र पैदास हा मानवजातीच्या बाबतीत वरदान न ठरता शाप ठरतो. बाहेरची वस्तुस्थिती आणि आतले मनोव्यापार व त्या मनोव्यापारांची जैविक बैठक या दोहोत जेव्हा काही मेळ असतो तेव्हा जीवनाला धोका कमी असतो. प्राण्याच्या बाबतीत असा मेळ आहे. माणसाच्या बाबतीत तो नाही. प्रतिकांवर आधारीत शब्द व भाषा ज्या दिवशी माणसाला अवगत झाले त्या दिवसापासून असा मेळ राहणे अशक्यप्रायच बनले. शब्द व भाषेने माणसाचे जीवन आमूलाग्र बदलून टाकले. बाहेरचे वातावरण आणि माणसाचा स्वभाव यात जो एक नैसर्गिक संबंध तोपर्यंत सांभाळला जात होता तो संपूर्णतया विघटून गेला. एका बाजूने भौतिक प्रगती, कृत्रिम हत्याराचे उत्पादन, बौद्धिक कर्तृत्व या बाबतीत तो झपाट्याने पुढे जात राहिला तर त्याची नैतिक भावना पूर्वी होती तिथेच घुटमळत राहिली. माणसाची भौतिक संपत्ती प्रचंड प्रमाणात वाढली आहे पण त्याची सामाजिक जाणीव त्याच प्रमाणात वाढली आहे काय असा जर प्रश्न आपण आपल्यालाच विचारला तर त्याचे उत्तर " नाही " असेच द्यावे लागेल. आपली संवेदनशीलता फारशी वाढलेली नाही. करुणा वाढलेली नाही. इतरांच्या सुखदुःखाचा विचार आपण तितपतच करतो. त्यासाठी अर्थात यत्किंचिताच्या पहिल्या माणसाने त्या हत्याराचा उपयोग आपल्याच भाऊबंदांच्या टाळक्यात घालण्यासाठी केला. विसाव्या शतकाला अणुबॉम्ब शोधून काढणारा त्याचाच प्रगत मानववंशज हा बॉम्बचा उपयोग इतरांना नमविण्यासाठीच करीत आहे. अर्थात पाषाण युगाच्या पहिल्या मानवाने अग्नी मिळताच इतर माणसांना भाजून खाण्यासाठी तो अग्नी वापरला. आजचा मनुष्य इतर मनुष्यांना भाजून खाणार नाही पण त्यांच्यावर बॉम्ब वर्षाव करून त्यांना जाळून टाकतो !

... मदतीने माणसाला स्वतःचे व्यवहार करता येतात या गोष्टीचा ... फायदा झाला की तोटा असा जर प्रश्न कोणी एकदम आपणास विचारला

तर त्या प्रश्नाचे उत्तर ' तोटा ' असेच आपण देऊ. कारण या नव्या शक्तीमुळे माणसे परस्परांच्या अधिक जवळ येण्याऐवजी परस्परांपासून ती अधिक दूर मात्र जात आहेत हे तर आपण आज स्पष्टच पाहात आहोत. वनून माकडांना तोंडाने जेमतेम दोनचार आवाज काय ते काढता येतात. पण त्या आवाजातल्या नेमक्या भावना कळपातल्या आणि कळपाबाहेरच्या हरएक वनून माकडाला न चुकता कळतात. हा आवाज शत्रूला भीती दाखविण्याचा. हा दुसरा मित्राना सावधगिरीची सूचना देण्याचा. तर हा तिसरा आनंदाच्या जल्लोषाचा. वनून माकडांपैकी शत्रू वा मित्र आवाजाच्या अर्थाचा कोणाचाही घोटाळा होत नाही. वनून माकडे आणि तर अनेक प्राणी फक्त भावनांची भाषा बोलतात. खरे तर ती भाषा नव्हेच भावना दर्शविणारे चित्कारासारखे ते शारिरीक अविर्भाव असतात. माणसाची भाषा भावनेपासून खूप दूर गेली आहे. माणसाच्या भाषेत प्रत्येक शब्दाला कसला ना कसला अमूर्त अर्थ देण्यात आला आहे. शारिराच्या संवेदनांपासून ती भाषा खूपच दूर गेली आहे. भाषेला असलेली तर्काची चौकट जेवढी जास्त वाढते तेवढी ती भाषा अधिक शुष्क बनते. तिच्यातला भावनात्मक अंश कमी होतो. आजची आपली वरोचशी भाषा ही केवळ तार्किक भाषा आहे. भावना अलग करून आपण आपले सारे व्यवहार आज करू पाहातो. त्यामुळे आपल्या सगळ्याच संबंधात एक प्रकारचा शुष्कपणा येतो आहे. शब्द आणि शब्दावर आधारित संकल्पनांच्या मदतीने सर्व व्यवहार करू पाहाण्याच्या प्रवृत्तीचे हे काही ठळक दोष म्हणता येतील. परंतु शब्द, भाषा आणि अमूर्त विचारसरणीमुळे मानवजातीचे केवळ अकल्याणच झाले आहे असे म्हणणे चूक ठरेल. अमूर्त विचारसरणीचे अनेक फायदेही आहेत. उदा. आपले कुतूहल जागे आहे याला कारण अमूर्त चौकटीत विचार करण्याची आपली सवय; नव्हे आपल्या कुतूहलाचा जन्मच मुळी अमूर्त विचारसरणीतून झाला आहे. बाहेर जे जे आपण पाहातो ते काय आहे, त्याचे तंत्र काय इत्यादी अनेक गोष्टी आपणाला समजून घ्याव्याशा वाटत असतात. प्रत्येक घडामोडीला काही ना काही स्पष्टीकरण असलेच पाहिजे आणि आपण ते समजून घेतलेच पाहिजे असे माणसाला वाटते. माणसाला सर्वात जास्त जर कशाची भीती वाटत असेल तर ती स्पष्टिकरण नसणाऱ्या घटनांची. शाब्दिक प्रतीक आणि त्याच्या साहाय्याने तयार करण्यात आलेल्या संकल्पना म्हणजे बाह्य घटनांचा अर्थ सांगणारी स्पष्टीकरणेच होत. या संकल्पना एकीकडे आपले कुतूहल शमवितात आणि दुसरीकडे ते जागेही ठेवतात. संकल्पना ही स्पष्टीकरणे असतात ही गोष्ट खरी. पण कोठलेही स्पष्टीकरण हे कायम स्वरूपाचे असू शकत नाही. कारण कोठल्याही विवक्षित क्षणी वास्तवाचे सर्वांगीण ज्ञान आपणास असत नाही. त्या त्या क्षणी जे काही ज्ञान आपणापाशी असते त्याच्या साह्याने आपण त्या स्पष्टीकरणवजा संकल्पना तयार केलेल्या

असतात. वास्तवाचे आपले निरिक्षण वाढलें किंवा बदलले की स्पष्टीकरण म्हणजेच संकल्पनाही बदलावी लागणार असते. बाहेरची वस्तुस्थिती चित्रांच्या स्वरूपात आपण आपल्या नजरेसमोर आणतो. ही चित्रे म्हणजे बाह्य वस्तुस्थितीचे स्वरूप ध्या सोयीसाठी आम्ही रचलेले मानसिक मॉडेल. अर्थात आपण तयार केलेले मानसिक चित्र आणि प्रत्यक्ष वस्तुस्थिती या दोहोत काहीच साम्य नसते असे नाही. जर या दोघात कसलेच साम्य नसते तर याच वस्तूस्थितीचे हे चित्र असे आपण म्हणूच शकलो नसतो. आपण ज्याना विचार म्हणतो ते विचार म्हणजे बाह्य वस्तुस्थितीसंबंधीचे तर्कशास्त्राच्या आधारे तयार करण्यात आलेले चित्र. ( विट्गेनस्टेन – ट्रक्टस लॉजिको – फिलॉसॉफिकस–२ १; २.१२; २.०६; ३ ) वस्तुस्थिती उमजून घेण्यासाठी वा दुसऱ्याला समजावून सांगण्यासाठी माणूस त्या वस्तुस्थितीचा चित्रमय आराखडा स्वतःशी बनवितो. हा आराखडा तो चिन्हे व प्रतीकांच्या मदतीने बनवितो. याचाच अर्थ असा की वस्तुस्थितीचा अर्थ सांगणारी ही चिन्हे वा चिन्हमय स्पष्टीकरणे तात्पुरती असतात. कारण ज्या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरणे म्हणून ती तयार करण्यात येतात ती वस्तुस्थिती आतून जशी आहे तशी माणसाला कधीच माहित होत नाही. या वस्तुस्थितीसंबंधी जी जी विधाने आपण करू ती नेहमी काल्पनिकाच्याच (फिक्शनच्या) स्वरूपाची असतील. कारण आपले विधान प्रत्यक्ष वस्तुस्थिती-बद्दलचे नसते तर त्या वस्तुस्थितीचे जे एक मानसिक चित्र (फिक्शन) आपण स्वतःशी तयार केलेले असते त्या चित्रासंबंधी असते. तेव्हा वस्तुस्थितीला म्हणून दिलेला दुजोरा वा निषेध हा त्या वस्तुस्थितीचा दुजोरा वा निषेध नसून तो जें काल्पनिक चित्र आपल्या मनाशी आपण रचलेले असते त्या चित्राचा असतो. जे जे आपण विचारात ग्रथित करतो ते ते सर्व फिक्शनच्या स्वरूपाचे असते. वास्तवा-संबंधीचे आपले प्रत्येक प्रतिपादन, विचार, म्हणजे वास्तवासंबंधीचे एक एक फिक्शन होय. "डोळे अगणित आहेत स्फिंक्सलादेखिल डोळे आहेत. जितके डोळे तितकी सत्ये. एकमेव अबाधित सत्य जगात असूच शकत नाही" ( नित्शे ) "ज्याला आपण सत्य म्हणतो तो देखिल एक गफलतच असते. पण विचार करता येण्यासाठी अशा गफलती वापरल्यावाचून माणसाला गत्यंतरच नाही" ( नित्शे ) सारांश, वास्तवाचा अर्थ सांगणारी स्पष्टीकरणे म्हणून ज्याना आपण मान देतो त्या सगळ्या संकल्पना म्हणजे त्या त्या वेळी आपणाला शक्य झालेले वास्तवाचे निरिक्षण होय. कोठल्याही विवक्षित क्षणी हे निरिक्षण अंतिम असू शकत नाही निरिक्षण बदलताच निरिक्षणावर आधारित निष्कर्षही बदलणार असतो. म्हणजेच आपण कुठलाही चालवणार असले वास्तवासंबंधीच्या कोठल्याही स्पष्टीकरणाने माणसाचे समाधान होत नाही. त्याला वास्तवासंबंधी अधिकाधिक स्पष्टीकरण हवे असते. म्हणूनच वास्तवाचा नवा नवा आणि अधिक खोल अर्थ त्याला हवा असतो.



अनुक्रमणिका



आपण शाब्दिक विचारसरणीत वावरत असल्यानेच केवळ हे शक्य होतें. माणूस वगळता इतर कोठल्याच प्राण्याच्या बाबतीत हे घडत नाही. इतर प्राण्याना वास्तव हा ज्याचा विचार करावा असा प्रश्न नसतो. कुत्र्याच्या समोर जर ओंडका आला तर कुत्रा कदाचित त्याच्यावरून उडी मारून पलिकडे जाईल. कदाचित ओंडक्याला वळसा घालून पलिकडे जाईल. कदाचित पुढे न जाता माघारीही वळेल. फक्त माणूसच ओंडक्याचा विचार ओंडका हा एक प्रश्न असून पुढील खेपेसाठी त्याचे उत्तर मनात साठवून ठेवले पाहिजे अशा प्रकारे करील. आयुष्यातली प्रत्येक बाब हा माणसाच्या दृष्टीने "प्रश्न" असतो. इतर प्राण्याना प्रत्येक प्रश्न स्वतः सोडवावा लागतो. माणूस प्रश्नाचे उत्तर इतराना सांगू शकतो. चिन्हे व प्रतीके आणि त्यांच्यावर आधारित संकल्पनांचा वापर करीत असल्यानेच केवळ त्याला हे जमू शकते. माणसापाशी जर संकल्पना नसत्या तर एका पिढीने संपादित केलेले ज्ञान विनासायास पुढील पिढ्याना देता आले नसते. सृष्टीच्या स्वरूपासंबंधी जे काही ज्ञान आपल्यापाशी आहे त्याचा उगम सृष्टीविषयक कुतूहलात आहे. पण हे कुतूहल संकल्पनांमुळे जिवंत राहातें. कुतूहल आणि संकल्पनाशक्ती एकमेकांवर अवलंबून असतात. माणसाची जिज्ञासा कधीही पूर्ण होत नाही. माणूस हा अखंड जिज्ञासू प्राणी आहे आणि अखंड जिज्ञासा हीच सगळ्या शोधाची नि प्रयोगाची जननी होय. जिज्ञासा माणसाला सतत प्रश्न विचारावयास प्रवृत्त करते. ही प्रश्नकर्त्यांची प्रवृत्ती अगदी प्राथमिक मानवातही दिसून येते. भवताली जे काही घडत असते त्यासंबंधी माणूस प्रश्न निर्माण करतो आणि स्वतःच त्याची उत्तरेही शोधू पाहातो. कधी ही उत्तरे प्रयोगशाळेत शोधली जातात. संशोधन आणि प्रयोग म्हणजे भवतालच्या सृष्टीबरोबरचा मनुष्यप्राण्याचा संवादच होय. गवसलेली उत्तरे संकल्पनांच्या स्वरूपात लिहून ठेवता येत असल्याने एखाद्या प्रश्नासाठी एकापेक्षा अधिक संभाव्य उत्तरेही माणूस तयार करू शकतो. माणसाला शाब्दिक संकल्पना वापरता येत असल्याने घटनेची कार्य आणि कारण अशी सांगड तो घालू शकतो. यापुढची पायरी म्हणजे भावी परिणामांची आगाव अटकळ बांधणे आपण आता जे करीत आहोत त्याचे भावी परिणाम काय होऊ शकतील याची अटकळदेखिल यातच मोडते. तात्पर्य, संकल्पना बनविण्याच्या सवयीमुळे माणूस संकटात सापडला आहे हे जरी खरे असले तरी त्याच सवयीमुळे त्या संकटावर तो मातही करू शकेल.

अमूर्त आणि संकल्पनात्मक विचारपद्धतीचे तोटे आपण पाहिले तसेच फायदेही आपण पाहिले. एखादी कृती करण्याच्या कितीतरी आधी त्या कृतीच्या परिणामाची आणि अपपरिणामांची अटकळ आपण संकल्पनात्मक विचारसरणीमुळे करू शकतो. आपणाला जर वाटले की आपण करणार आहोत त्या गोष्टीने आपले वा इतरांचे नुकसान होईल तर त्या कृत्यापासून आपण परावृत्त होऊ

असतो. यालाच आपण विवेकाने वागणे म्हणतो. आपण म्हणतो की माणूस विवेकशील असल्याने कोठलिही गोष्ट करताना तो नेहमी विचाराने करतो. आपली विवेकशक्ती किंवा आपले नैतिक आचारशास्त्र केवळ संकल्पनात विचार करण्याच्या आपल्या शक्तीवर अवलंबून आहे. विवेकाच्या जोरावर हिंस्त्रपणा मनुष्याला कितपत काबूत ठेवता येणे शक्य आहे याचा विचार येथे आपण करणार आहोत. येथे प्रथमच एक गोष्ट कबूल करावयास हवी. हिंस्त्रपणा काबूत ठेवण्याची विवेकाची शक्ती अत्यंत मर्यादित आहे. माणूस विवेकशील असला तरी नेहमी विवेकानेच वागेल याचा भरवंसा देता येत नाही. विवेकाच्या या मर्यादाच येथे आपण उघड करणार आहोत. आपल्या शक्तीच्या मर्यादा काय हे ध्यानात ठेवले तरच या जगात वावरताना आपण कदाचित अधिक सावधानपणाने वागू. आज आपण असे मानतो की माणूस हा मूलतः विचारी प्राणी आहे. विचार हा त्याच्या स्वभावाचा स्थायीभाव आहे आणि प्रत्येक गोष्ट करताना ती विचाराने करण्याकडे त्याची प्रवृत्ती आहे. जगात काही माणसे अविचाराने वागताना दिसतात. पण त्याचे कारण त्यांच्यातील शिक्षणाचा अभाव. त्याना जर योग्य त्या प्रमाणात शिक्षण दिले गेले तर तेही विचाराने वागण्याची शक्यता आहे. अधिक संयमी बनण्याची शक्यता आहे. माणसाला विचार करता येत असल्याने आपल्याला काय हवे आणि काय नको याचा हिशेब तो आपल्या मनाशी करू शकतो. आणि जे हवे असेल ते मिळविण्यासाठी इतरांबरोबर सहकार्य करू शकतो. तसेच शिकणे हा मनुष्यजातीचा स्वभाव असल्याने मागील अनुभवावरून माणूस शहाणा होईल. हाच शहाणपणा त्याच्या पुढच्या पिढ्यात उतरेल. एकजूटीने काम करताना त्याला नवीन गरजा भासू लागतील. पण तो मूलतः प्रगतिशील असल्याने स्वतः होऊन तो इतरांशी सहकार्य करीत राहील व त्यामुळे त्याचा समंजसपणा, त्याची आकलनशक्ती, निरनिराळ्या क्षेत्रातील त्याचे कसब, त्याची साधने यात सतत भर पडत राहील. थोडक्यात सांगायचे तर आपण असे म्हणतो की माणूस शहाणा असल्याने स्वतःच्या आक्रमक, हिंस्त्र प्रवृत्तींवर तो स्वतःच ताबा चालविल. दुर्दैवाने स्वतःच्या अंगभूत शहाणपणावरचा, समंजसपणावरचा व विवेकावरचा आपला हा विश्वास बराचसा अनाठायी आहे. जितक्या लवकर आपण हा समज टाकून देऊ तितके चांगले. कारण भ्रम मग तो कोठल्याही प्रकारचा असो तो मनुष्याला नेहमीच हानीकारक ठरतो. जितक्या लवकर आपण स्वतःसंबंधीचे सत्य स्वतःशी मान्य करू तितक्या लवकर आपण अधिक सामर्थ्यवान बनू. आपण विवेकशील आहोत व कोठल्याही प्रसंगी विवेकानेच वागत राहू असे मानीत राहिल्याने अनेकदा आपण बेसावध राहतो व हातून अविचाराचे कृत्य घडू देतो.

पशूमध्ये आक्रमक प्रवृत्ती काबूत ठेवण्याचे नैसर्गिक अटकाव inhibitions



अनुक्रमणिका



असतात जनावरे झुंजीत द्वेषाने कितीही बेभान झाली तरी एकदा का एकजण नामोहराम झाला की मग त्याला कायमचा जायबंदी करू पाहात नाहीत. त्यांच्या प्रजातीचे शरणागतीचे विशिष्ट हावभाव त्याने केले म्हणजेच आपण शरण आलो आहोत अशी प्रतिकात्मक कबुली दिली की ते मारामारीतून दूर होतात. हे प्रतिकात्मक अविर्भाव त्यांच्यात नैसर्गिकरित्या विकसित झाले आहेत आणि जन्मत: स्वत: बरोबर घेऊन हे प्राणी जन्मतात. मनुष्यामध्ये या प्रकारचे अंगभूत अटकाव नाहीत त्याऐवजी सामाजिक आचारविचार व नैतिक नियम आहेत. माणस सामाजिक व नैतिक निषेध मानतो व एखादे अपकृत्य करण्यापासून दूर राहतो. हे नैतिक आचार-विचार व सामाजिक ' संकेत मनुष्याच्या खाजगी व सार्वजनिक आचारविचाराचे नियमन–नियंत्रण करतात. मानवी समाजात अस्तित्वात असणाऱ्या या नैतिक आदर्शामुळेच मनुष्य बेफाम बनत नाही. शक्यतोवर सामाजिक नीतींच्या चौकटीत राहू पाहातो. दंड नीतिही माणसाला कायद्याच्या मर्यादेत राखते. सामाजिक व नैतिक कायदे आणि दंडनीती म्हणजे एक प्रकारे मनुष्याच्या आचारविचारावर सत्ता चालविणारी निषेध-यंत्रणाच inhibitions होय. पशुपक्ष्यात ही यंत्रणा अंतर्गत–नैसर्गिक वर्तनाचा भाग म्हणून असते. माणसात बाह्य कायद्याच्या व संकेतांच्या स्वरूपात तो आहे. जे पशवादी प्राणी हिंस्त्र व क्रूर आहेत त्यांच्या बाबतीत या यंत्रणेला फारच महत्व आहे. कारण ही यंत्रणा कार्यरत नसती तर एव्हाना आपापसात भांडताना प्राण्याच्या जातीच्या जाती पृथ्वीतलावरून नष्ट झाल्या असत्या.

माणूस शाकाहारी आणि मांसाहारी अशा दोन्ही जातीचा आहार घेतो. तो जर केवळ शाकाहारी अथवा मांसाहारीच असता तर त्याचे जीवन आज दिसते त्यापेक्षा सर्वस्वी वेगळे दिसले असते. माणूस सर्वभक्षक आहे. त्यातही शारिरीक शक्तीच्या बाबतीत कमकुवत असणारा सर्वभक्षक प्राणी आहे. या विशिष्ट वस्तुस्थितीमुळे उत्क्रांती प्रवाहात त्याच्या स्वभावाला काही वेगळी वळणे लागली आहेत. त्याला ना तीक्ष्ण नखे, ना तीक्ष्ण व मजबूत दात नि सुळे. ना कणखर शिंगे, ना शक्तीमान पंजे. शारिरीक बळाचे यापैकी कोठलेच साधन त्याच्यापाशी नसल्याने स्वतःविषयी तो कमी आत्मविश्वासपूर्ण असतो. तसेच या प्रकारच्या साधनांचा गैरवापर केला जाऊ नये म्हणून जी आंतरिक निषेधक यंत्रणा अशा साधनवाल्या प्राण्यांच्या ठिकाणी आढळते तिचाही त्याच्या बाबतीत पूर्ण अभाव आहे. माणसाची सगळी हत्यारे कृत्रिम असतात. त्यामुळे या हत्यारांचा वापर केव्हा बरोबर आणि केव्हा गैर हे त्याच्या ध्यानातही येत नाही. म्हणून माणूस केव्हाही बेफाम होण्याची शक्यता असते. माणसात आंतरिक निषेधक-यंत्रणा नाही त्यामुळे आक्रमक हत्यारे वापरताना जे ना आपण स्वाभाविक सावधपणा म्हणू आणि जो सावधपणा हिंस्त्र पशूंच्याही ठिकाणी आढळतो तो

माणसात दिसत नाही. सुदैवाने माणसात जिज्ञासूपणासारखा दुसरा एक असा गुणधर्म उत्क्रांतीक्रमात उत्क्रमित झाला आहे की जो वरील यंत्रणेच्या अभावाची कसर भरून काढू शकेल. माणसातला जिज्ञासूपणा त्याला स्वतःसंबंधी आणि एकूण सर्वच गोष्टीसंबंधी प्रश्न विचारावयास प्रवृत्त करतो. यातील काही प्रश्न त्याला एकदम नव्या शोधांकडे नेतात तर काही त्या शोधांच्या गर्भित नैतिक व सामाजिक परिणामांचा विचार करावयास प्रवृत्त करतात. आत्मज जबाबदारीने वागावयास भाग पाडतात. माणसाच्या जिज्ञासूवृत्तीने त्याला अशा प्रकारे बऱ्याच योग्य मार्गावर ठेवले आहे.

अर्थात आजचा मानव पूर्वीच्या मानवाच्या मानाने अधिक जबाबदारीने वागणारा व समाजशील आहे असे जरी आपण म्हणत असलो तरी आदिम मानव केवळ नरमांसभक्षक रानटी पशूच होता असे मात्र आम्हास म्हणावयाचे नाही. माणूस हा प्रारंभापासूनच सामाजिक आहे. एकटा माणूस हे शब्द माणसासंबंधी परस्परविरोधी असतात. मात्र आदिम मानव आत्मज जबाबदारीच्या बाबतीत आजच्या मानवाइतका विकसित झाला नव्हता. एखादे नवीन हत्यार हातांत आले की आपल्याशिवायच्या इतर मनुष्यमात्रांच्या विरुद्ध ते किती प्रमाणात वापरावे याचा अजिबात पाच आदिम माणसाला नसे. तो परिणामाची क्षीती न बाळगता अशा हत्यारांचा वापर करी. भूरशी हत्यारांच्या वापराने आपल्या सगळ्या प्रजातीलाच धक्का पोचेल याची पुसटशी शंकादेखिल तेव्हाच्या मानवाला वाटत नसे. कारण आजच्या मानवाची विचारशक्ती त्याच्यापाशी नव्हती. त्या भयानक काळापासून आज आपण खूपच दूर आलो आहोत. परंतु स्वतःच्याच हातानी स्वतःचाच विनाश करून घेतला जाण्याची भीती सर्वस्वी नष्ट झाली आहे असे मात्र आजही म्हणता येणार नाही. कारण नवनवी, अधिक शक्तीची प्राणघातक शस्त्रे शोधून काढण्याची आमची हौस आजही कमी झालेली नाही. किंवा या बाबतीतली आत्मज जबाबदारीची आमची भावना तीक्ष्ण बनली आहे असेही नाही. आज लांब पल्ल्याची अण्वस्त्रे माणसाने शोधून काढली आहेत. त्यांच्या साहाय्याने खूप दूरवर मारगिरी करता येते. आणि त्या मारगिरीचे परिणाम किती भयावह आणि करुणाजनक असू शकतात हे मारगिरी करणारे पाहू शकत नसल्याने माणूस अधिकच हृदयशून्य बनत आहे.

प्रारंभी माणूस भवतालच्या वातावरणावर इतर प्राणीमात्राप्रमाणेच अवलंबून होता. परंतु जेव्हा त्याला कृत्रिम हत्यारांची, अग्नी व वस्त्रप्रावरणे तयार करण्याची युक्ती सापडली तेव्हा तो बऱ्याच मोठ्या प्रमाणात स्वाधीन बनला. प्रारंभी माणूस जेव्हा निसर्गाच्या दयेवर जगत असे तेव्हा तो संपूर्णपणे निसर्ग आणि बाह्य वातावरण यांच्या कह्यात असे. निसर्ग त्याला भेडसावीत असे. बहुरूपीपण बनून आटल्यावर क्षुधा त्याचा मृत्यु बनून त्याच्या पुढे उभा ठाकत असे.





त्या कालखंडात निसर्ग हाच त्याचा एवढा मोठा शत्रू होता की त्याच्यापासून स्वत:ला सांभाळण्यातच त्याची सगळी शारिरीक–मानसिक शक्ती खर्च होत होती. त्यामुळे आपापसात मारामारी करण्याकडे व एकमेकांचा जीव घेण्याकडे लक्ष पुरविण्यास त्याला फुरसदच होत नव्हती. पुढे कृत्रिम हत्याराचा शोध त्याला लागला तसेच अग्नी व इतर जीवनोपयोगी साधनेही त्याने शोधून काढली. आणि मग पूर्वीचे सारेच चित्र पालटले. आता एक एक टोळी पूर्वीच्या मानाने अधिक स्वयं-पूर्ण बनली. तिचे सामर्थ्य वाढले. हे वाढीव सामर्थ्य शेजारच्या टोळयांच्या विरुद्ध वापरण्याकडे त्याचा कल होऊ लागला. उत्क्रांतीक्रमाची ही दुसरी पायरी म्हणता येईल. एका टोळीने दुसऱ्या टोळीस नामशेष करण्याचा प्रयत्न हे या पायरीचे वैशिष्ठ्य होय. टोळयांच्या आपापसातल्या लढाया हे या कालखंडाचे व्यवच्छेदक लक्षण. शौर्य-धैर्य पराक्रम या नावाने ज्या गुणधर्मांची स्तुती आपण करतो तो आक्रमक गुणधर्म या कालखंडात महत्पदास पोचला कालांतराने परिस्थिती बदलली. माणसामाणसांच्या व्यवहारात आक्रमकपणाची फारशी गरज उरली नाही. परंतु परिस्थिती पालटली तरी एकदा अंगात मुरलेला आक्रमकपणा कमी झाला नाही. आजच्या प्रगत समाजात तर त्या काळातल्या सारख्या आक्रमकपणाला जवळजवळ वावच उरलेला नाही. पण एकदा वाढलेला आक्रमकपणा तसा आपोआप कमी होणार नसतो. त्याला दुसऱ्या कोठल्या तरी अधिक सुरक्षित मार्गाने बाहेर काढून देणे आवश्यक आहे. पण आज काय होत आहे की असा आक्रमकपणा जणू आपल्या ठिकाणी नाहीच अशा प्रकारचा आव आपण आणित असतो. परिणामत: हा आक्रमकपणा दबला जाऊन अनेक प्रकारे माणसाना तो त्रासदायक ठरत आहे. न वाट मिळालेला आक्रमकपणा कसा त्रासदायक ठरतो याचे संशोधन कित्येक मानसशास्त्रज्ञानी केले आहे. सिडने मार्गोलिन हे असेच एक सायकोॲनलिस्ट. त्यानी रेड इंडियनांपैकी काही जमातींचा अभ्यास केला आहे. या जाती मुळात लढाऊ आणि युद्धपिपासू वृत्तीच्या होत्या. रक्ताचा बदला रक्ताने हा तेथला परंपरागत न्याय असे. शेकडो वर्षे ही परंपरा त्यानी पाळली होती. त्यामुळे त्यांचे सर्व जीवन या एका प्रवृत्तीसभोवती गुंफले गेले होते पण गोऱ्याचे वर्चस्व स्थापन झाल्यानंतर या प्रकारच्या आपापसातल्या युद्धाना तेथे थारा राहिला नाही. रक्ताचा बदला रक्ताने हा कायदाही जाऊन त्या ठिकाणी नवा कोर्टकचेऱ्यांचा कायदा आला. थोडक्यात या रेड इंडियन जमातीना त्यांच्या लढाऊ वृत्तीला मुक्तद्वार राहिला नाही सिडने मार्गोलिन म्हणतात की या सर्व घडामोडींचा विपरात परिणाम या जमातींवर झाल्याचे आढळते यातील अनेक व्यक्ती एका वेगळयाच प्रकारच्या मानसिक रोगाच्या बळी झाल्या आहेत सिडने मार्गोलिन यांच्या मताप्रमाणे शेकडो वर्षे त्यांच्या स्वभावाने जी एक विवक्षित दिशा पत्करली होती व ज्या प्रकारे त्यानी त्यांच्या आक्रमक, हिंसक प्रवृत्तीना वळण दिले होते त्या दिशेत व



अनुक्रमणिका

वळणात व्यत्यय आल्याने हा रोग त्याना झाला होता. ह्या हिंसक प्रवृत्ती या जमातींच्या हाडीमाशी खिळल्या होत्या. व बाहेर यावयास आजही त्या उत्सुक आहेत पण आज त्यांना तसे करता येत नाही. या जमातींच्या प्रतिष्ठेच्या, मानापमानाच्या वगळच्या कल्पना या एका प्रवृत्तीभवती बांधल्या गेल्या होत्या. आज पूर्वीच्या पद्धतीने या प्रवृत्ती प्रगट होऊ शकत नाहीत. तसेच दुसऱ्याही कोठल्या अधिक सुरक्षित सामाजिक मार्गाने त्यांचा निचरा होऊ शकत नाही. परिणामतः त्या त्याना आतल्या आत दाबून ठेवाव्या लागतात आहेत. या मानसिक दडपणाचा परिणाम म्हणजे त्याना झालेला मानसिक रोग होय. पूर्वी हिंसकपणा हा त्या समाजात मोठा कर्तृत्वाचा भाग मानला जात असे. तो एक महान सद्गुण होता. आज एकेकाळच्या या सद्गुणाला दुर्गुणाचे स्थान प्राप्त झाले आहे. म्हणजे स्पर्धा बाबतीत या जमातींचा कोंडमारा होत आहे. कारण आक्रमकपणा हा दुर्गुण ठरल्याने त्यांच्या मनात आत्मअपराधीपणाची भावना रुजली आहे. रेड इंडियन जमाती अशा प्रकारे दुहेरी कात्रीत गवसल्या आहेत. या सर्वांचा एकत्रित परिणाम म्हणजे त्याना झालेला मानसिक रोग. सिडने मार्गोलिन यांच्या अभ्यासावरून जो निष्कर्ष निघतो तो असा कधीकाळी हिंसकपणा व आक्रमक प्रवृत्ती जातीसंरक्षणासाठी मनुष्याला उपयुक्त असेल पण आज बदलत्या परिस्थितीत तिचा उपयुक्त-पणा संपुष्टात आला आहे. एवढेच नव्हे तर या प्रवृत्तीचे जे जबरदस्त अवशेष मानवजातीच्या मनात राहून गेले आहेत त्याचे काय करायचे, त्यांच्याशी कशा प्रकारे जमवून घ्यायचे हा आजचा मानवसमाजापुढे एक महत्वाचा प्रश्न आहे.

माणूस हा स्व-निर्माणक (Scfl–creative) आहे. माणूस हा गट करून राहणारा प्राणी आहे. म्हणजेच तो समाजशील प्राणी आहे. तो समूहात किंवा समाजात राहतो. त्याच्या अंगी अशा काही शक्ती (abilities) आहेत की ज्या फक्त त्याच्याच अंगात आहेत. इतर प्राण्यांच्या ठिकाणी त्या नाहीत. त्याची भाषा, संकल्पनात विचार करण्याची त्याची शक्ती, आपल्या गरजा विचारात घेऊन त्याप्रमाणे खटपट करण्याची त्याची तयारी व शक्ती या गरजांमधून व त्यांच्या परिपूर्तीतून बदलत जाणारे त्याचे जीवन किंवा विश्व. परत नव्या विश्वाबरहुकूम नव्या तरतुदी करण्याकडे असलेला त्याचा कल. थोडक्यात, माणसाच्या ठिकाणी आढळणाऱ्या काही गरजा या फक्त मानवविशिष्टच आहेत. त्या इतर प्राण्यांमध्ये नसतात. माणूस एकमेकांच्या सहवासात राहात, वाढत, जगत व काम करत असल्याने या गरजा तयार होतात. म्हणजेच माणसाच्या एकत्रित राहण्याची ती फलश्रुती आहे. दुसरे, माणसे एकत्रित राहात असल्याने त्यांच्या ठिकाणी ज्या शक्ती (Capacities) तयार होतात त्या शक्तींच्या पायी या गरजा निर्माण होतात, तिसरे, या शक्ती जेव्हा विकसित होतात तेव्हा माणूसही त्या प्रक्रियेत बदलत जातो. सामाजिक व सांस्कृतिक अशी जी ही प्रक्रिया सुरू असते तिने माणूस

बदलतो. माणसाबरोबर त्याची परिस्थिती आणि उलट परिस्थिती बदलता बद-लता ती माणसालाही बदलून टाकते. माणूस हा समाजशील प्राणी आहे आणि त्याच्या ठिकाणी जातीविशिष्ट अशा काही खास शक्ती विकसित होतात. माणूस हा ठरवून कृती करतो. मुद्दाम विचार करून स्वतःच्या जगात बदल घडवून आणतो. त्याच्या आयुष्याला प्रयोजन असू शकते म्हणजेच तो स्वतंत्र आहे. इतर प्राण्यांना असे प्रयोजन नसते. ते स्वतंत्र नसतात. आपणाला काय हवे किंवा काय नको हे माणसाला ठरविता येते. ते विचारात घेऊन त्याप्रमाणे आपल्या हालचाली ठरविता येतात. जाणूनबुजून तो मार्ग आक्रमिता येतो. अशा प्रकारे इतरांमध्ये राहाता-जगता जगता त्याच्यातल्या वर म्हटलेल्या त्या शक्ती दृढ होतात आणि त्या दृढ होता होता त्याचे आयुष्य बदलत जाते. माणसे विचार करू शकत असल्याने व आखून कार्यक्रम हाती घेऊ शकत असल्याने त्यांच्या बाबतीत हा बदल शक्य असतो. इतर प्राण्यांच्या बाबतीत ते शक्य नसते. याच अर्थाने आपण माणसाला वर स्वयं-निर्माणक म्हटले आहे. माणूस जे काही परिश्रम करतो–हे परिश्रम तो इतरांच्या सहकार्याने, त्यांच्यात राहून करतो-त्या परिश्रमातून तो माणूस बनतो. इतिहासाच्या प्रक्रियेत तो अशा प्रकारे अधिकाधिक माणूस बनतो. असो. तर माणसाच्या भवतालचे सामाजिक सांस्कृतिक जग अशाप्रकारे माणसाच्याच घडपडी-तून बदलत असते. परंतु ज्या वेगाने बाह्य जगात बदल घडत असतात त्या वेगाने माणसाच्या आतल्या जगात, त्याच्या मनोधारणात बदल घडून येत नाहीत. माणूस बाह्य संस्कृतीने पुढे जातो पण त्याचा स्वभाव मागे राहातो माणूस रानटी अवस्थेत होता तेव्हा बाहेरच्या जगातल्या अडचणींशी संकटाशी टक्कर देण्यासाठी त्वेषाकारख्या गुणधर्मांचा उपयोग होता. पण आता कायदा, न्याय, पोलीस इत्यादी संस्था स्थापन झाल्यानंतर व एकूणच सामाजिक जीवन सौम्य बनल्यानंतर पूर्वीच्यातल्या त्वेषभावनेची व आक्रमकतेची गरजच राहात नाही. म्हणजेच उत्क्रांतीच्या एका स्तरावर लढवय्येपणाच्या ज्या गुणधर्माला कर्तबगारी गणले जात असेल तोच नंतरच्या स्तरावर दुर्गुणात जमा होतो. आता गंमत अशी की लढवय्येपणाचा गुणधर्म काही उत्क्रांतीच्या त्या विशिष्ट स्तरावर माणसाच्या अंगी बाणला गेलेला असतो. तो फार आधीपासून तेथे तयार होऊन आलेला असतो. अशा परिस्थितीत व्यक्तीचा स्वाभाविक कल आणि त्या संस्कृ-तीच्या एकूण सांस्कृतिक गरजा या दोघांमध्ये संघर्ष सुरू होतो. किंवा व्यक्तिच्या वैयक्तिक गरजा आणि व्यक्ती ज्या समाजाचा घटक असते त्या समाजाच्या सामाजिक गरजा या दोहोत संघर्ष सुरू होतो. हा संघर्ष मर्यादित ठेवण्याचे कार्य त्या त्या समाजात जो नैतिक आचारधर्म रुढ असतो तो नैतिक आचारधर्म करीत असतो. कारण हा आचारधर्म सामाजिक उत्क्रांतीबरोबरच उत्क्रांत झालेला असतो. त्यामुळे भौतिक प्रगतीच्या विवक्षित टप्प्यावर



अनुक्रमणिका

असणाऱ्या समाजाला सर्वसाधारणपणे समान मार्गदर्शन करू शकेल अशा प्रकारची तत्वे त्यात अंतर्भूत झालेली असतात. माणसाच्या सहजप्रवृत्तींवर अंकुश ठेवण्याचे कार्य हा आचारनीतीधर्म करीत असतो. पूर्वी साध्यासुध्या भांडणातही शत्रूचा जीव घेणे ही बाब फारशी गंभीर मानली जात नसे. आज समाज या प्रकारचे वर्तन मान्य करणार नाही. एवढेच नव्हे तर समाजाची ही इच्छा त्या समाजातल्या लोकांच्याही मनावर बिंबलेली असल्याने एखाद्याला कितीही क्रोध आला तरी तो शक्यतोवर गोष्टी इतक्या भयंकर थरास जाऊ देणार नाहीत. म्हणजेच आचारनीतीधर्म आततायी कृत्यांपासून मनुष्याला परावृत्त करतो. सांस्कृतिकदृष्टया पुढारलेला समाज आणि त्या समाजव्यवस्थेच्या नाना प्रकारच्या गरजा आणि मनुष्याचा निसर्गदत्त स्वभाव या दोहोत समतोल राखण्याचे काम आचारनीतीधर्म करीत असतो. तथापी एक गोष्ट येथे लक्षात ठेवावयास हवी. ती ही की नैसर्गिक स्वभाव हा उत्क्रांतीक्रमाने आपल्यात संक्रमित झाला आहे असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा आचारनीतीधर्म ही फक्त शिकण्याची बाब आहे असे आपणास सुचवायचे नाही. काही एका प्रमाणात आचारनीतीधर्म देखिल आपल्या ठिकाणी स्वाभाविकच बनलेला असतो. मात्र उपजत गुणधर्मांचा प्रभाव आपल्या मनावर जितका खोल व घट्ट असतो तितका हा प्रभाव खोल व घट्ट असत नाही. उपजत स्वभाव हा इतिहासपूर्वकालापासूनही चालत आलेला असतो. त्या मानाने आचारनितीधर्म ही अलिकडची भर असते. शिवाय सामाजिक स्थित्यंतराबरोबर तीत बदलही घडत गेलेले आहेत. वांशिक उत्क्रांतीक्रमात संक्रमित झालेले लढवैय्येपणासारखे गुणधर्म आणि समाजाभिमुख आचारनीतीधर्मासारखी व्यावहारिक आचारशास्त्रे यात मोठा फरक हा आहे की ही आचारशास्त्रे काळाच्या गरजांशी सुसंगत असतात. भौतिक, सामाजिक, ऐतिहासिक इत्यादी जे अनेक प्रकारचे बदल मानवी समाजात घडून येत असतात त्यांच्याशी त्या आचारधर्माचे अनुसंधान असते. याऊलट मानवी आक्रमकप्रवृत्तीसारख्या प्रवृत्ती विकासाच्या फारच खालच्या टप्यावर असतात. दोहोत साम्य हे की दोन्हीही उपजत गुणधर्मांगत असतात आक्रमकप्रवृत्तीसारख्या प्रवृत्ती आणि आचारनीतीधर्मासारखी वर्तने यात आणखी एक मोठा फरक असा की आक्रमकप्रवृत्तीसारख्या प्रवृत्ती या बाह्य चालनाना तुम्ही जे आतून प्रतिसाद देता त्यातून संक्रमित होतात, उलट आचारनीतीधर्मासारख्या वागणुकी या तुमच्या बाहेरून बलात्काराने लादल्या जाऊन हळूहळू त्या तुम्ही अंगी बाणविता. असो.

आजच्या अनेक मानस व समाजशास्त्रज्ञांचे म्हणणे असे दिसते की कोठलेही कृत्य विचारपूर्वक करणे, विचाराने वागणे हा मनुष्याचा स्वाभाविक गुणधर्म आहे. मनुष्य सामान्यतः विचाराने चालतो. आणि मनुष्य विचाराने चालत







असल्याने तो समाजशील बनला आहे. मनुष्य विचारी असल्यामुळे तो समाज करून राहातो. स्वार्थ आणि परार्थ यात स्वार्थ प्रबल आहे. जेव्हा मनुष्याची विचारशक्ती लटकी पडते तेव्हा तो स्वार्थी बनतो व समाजविघातक कृत्य करावयासही तयार होतो. पंडितांचे हे मत अत्यंत चुकीच्या पायावर उभे आहे. मनुष्य हा समाजशीलच आहे. स्वाभाविक प्रवृत्ती म्हणूनच तो समाजशील आहे. मनुष्य म्हणून जी त्याची वैशिष्ठ्ये आहेत ती तो समाजशील असल्यामुळेच केवळ विकसित होऊ शकली आहेत. मनुष्य जर केवळ स्वार्थीच असता, फक्त स्वतःचाच फायदा पाहावा एवढेच जर त्याला वाटत राहिले असते तर तो मनुष्यच होऊ शकला नसता. त्याच्यात व्यक्तिवादी किंवा अहंकेंद्रितता आणि समूहवादी अशा दोन्हीही प्रवृत्ती आहेत. माणसाची भाषा, सांस्कृतिक परंपरा, विवेकशील आचारनीतीधर्म, या सर्व गोष्टी फक्त माणसाचीच लक्षणे असतात. इतर कोठल्याही प्राण्याच्या ठिकाणी ती आढळून येत नाहीत.

आपले बरेचसे विचारवंत आणि आपण सामान्य माणसेही असे समजतो की माणसाला प्रथम शब्द वापरता येऊ लागले व मागाहून शब्दांच्या साहाय्याने त्याला नैतिक विचार बनविता येऊ लागले. थोडक्यात नैतिक आचारविचार ही एक नंतरची घटना आहे. प्रारंभी माणूस फक्त स्वार्थाकडेच तेवढे लक्ष पुरवित असे. नंतर त्याला शब्द बनविता येऊ लागले, पुढे शब्दांच्या साहाय्याने विचार करता येऊ लागले व विचार करता येऊ लागल्याने त्याला बऱ्या–वाईटाचा समज आला. परंतु हा समज अगदी चुकीचा आहे. माणूस जेव्हा अगदी रानटी अवस्थेत, जवळजवळ वानरासारखा राहात होता तेव्हाही त्याच्यात नीतीचा अंश होता. आपल्या मित्राला संकटात मदत केली पाहिजे, आपल्या स्त्रियांचे आणि मुलांचे शत्रूच्या हल्ल्यापासून रक्षण केले पाहिजे, हे रक्षण करताना प्राण देण्याची वेळ आली तर प्रसंगी प्राणही द्यावयास हरकत नाही या प्रकारची वागणूक कोठल्याही काळी व कोठल्याही ठिकाणी नीतीतच मोडेल. आदिम मानव जेव्हा भाषा वापरीत नव्हता तेव्हाही या प्रकारचे वर्तन करीत होता. एवढेच नव्हे तर हे गुण अंगी बाणवून तो कळप करून राहात होता. म्हणूनच तो भाषा, संकल्पनात्मक विचार वगैरे विकसित करू शकला. शब्द आणि भाषा येण्याच्या कितीतरी आधी आदिम मानव अपत्यावर प्रेम करीत होता, मित्रासाठी किंवा कळपासाठी आत्मबलिदानाची तयारी दाखवित होता. याचाच अर्थ असा की आपल्या विवक्षित कृतीचे परिणाम काय होऊ शकतील याचा वैचारिक आढावा घेण्यापूर्वीच अशा प्रकारचा भावनिक आढावा घेऊन तो वागू लागलेला होता. म्हणजे बीजरूपात नीती त्याला फार आधीपासून–शब्दाधारित विचारशक्तींचा प्रादुर्भाव त्याच्या ठिकाणी होण्याच्या कितीतरी पूर्वीपासून–अवगत होती. त्याच्या वागण्यात ती व्यक्त होत होती. नीती हीदेखिल उपजत आहे.

कांटने म्हटले आहे की माणसे सारासारबुद्धीने वागतात कारण ती विचार करू शकतात. जर त्याना विचार करता आला नसता तर ती सारासारबुद्धीने वागली नसती. थोडक्यात माणूस जो आचारनीतीधर्म पाळतो त्याचा उगम त्याच्या विचारशक्तीत आहे. आपण वर नेमकी याच्या विरुद्ध भूमिका घेतली आहे. आपण म्हटले आहे की आक्रमक वा इतर अंगभूत प्रवृत्ती या जशा उत्क्रांतीक्रमात माणसाच्या अंगात बाणत गेल्या तशाच प्रकारे अनेक प्रकारची नैतिक वळणेही बाणत गेली. या दोन वळणात फरक इतकाच की आक्रमकप्रवृत्ती-सारख्या प्रवृत्ती या बाह्य वातावरणातून ज्या चालना ( किंवा आव्हाने ) जीवाला येत. त्याला द्याव्या लागलेल्या अंतर्गत प्रतिसादातून तयार होत होत्या. नैतिक वळणे समाजात एकमेकांबरोबर जगताना, वाढताना, कष्ट करताना, संकटांशी झगडताना ज्या अनेक प्रकारच्या गरजा आणि निकडी माणसाला वेळोवेळी वाटत राहिल्या त्यातून तयार होत होती. सहजप्रवृत्ती आणि ही नैतिक वळणे यात दुसरा फरक असा की सहजप्रवृत्ती एकदा दृढ झाल्या की त्यात बदल फारच संथ गतीने होतात. तर नैतिक वळणांचा संबंध बऱ्याच अंशानी बाहेरील जगातल्या माणसाभव-तालच्या आर्थिक, सामाजिक वगैरे वातावरणाशी असल्याने हे वातावरण बदलताच ही वळणेही बदलू लागतात. हा बदल ही गोष्ट माणसांच्या बाबतीत अपरिहार्य आहे. माणूस हा स्वभावतःच उत्पादक आहे. कारागीर, कष्टकरी. निर्माणकार ( Maker ) आहे. तसेच माणूस हा समूह करून राहाणारा आहे. म्हणजेच तो समाजशिल आहे तो जेव्हा काम करू लागतो तेव्हा त्याच्या अंगात ज्या अनेक सुप्तशक्ती ( Potentilaities ) आहेत त्या विकास पावतात. मात्र सुप्तशक्ती विकसित होणे एवढेच माणसाचे वैशिष्ठ्य नाही. इतर प्राण्यातही तो गुणधर्म आढळतो. सवयीने कुत्रा अनेक कसरती करून दाखविल. सुप्तशक्तींच्या बाबतीत माणसाचे वैशिष्ठ्य हे आहे की आपल्या ठिकाणी हे गुणधर्म आहेत याची त्याला जाणीव आहे. त्याची जाणीव ठेवून त्या तो राबवतो, विकसित करतो, मुद्दाम ठरवून त्या प्रकारे त्या वापरतो. स्वतःच्या योजनांसाठी त्याचा उपयोग करून घेतो. माणूस हा स्वतःच स्वतःचे साधन वा हत्यार असून त्यामुळे स्वतःच स्वतःचे तो साध्य असतो. स्वतःच्या शक्तीची माणसाला जाणीव असल्याने व हेतुपूर्वक या शक्ती तो वापरीत असल्याने या शक्ती त्याच्या ताब्यात असतात. तो स्वतःचा मालक असतो. इतर प्राणी निसर्गाचे का होईना पण स्वतःपेक्षा कुणा इतर शक्तीचे गुलाम असतात. माणूस त्याच्या अंगच्या शक्ती व कौशल्ये नुसती वापरतच नाही तर वापरता वापरता नव्या शक्ती व कौशल्ये आत्मसातही करतो. त्याला जे काही साध्य करायचे असते ते विचारात घेऊन त्याप्रमाणे स्वतःच्या योजना तो आखतो त्या योजना कार्यान्वित करतो. थोडक्यात, आपल्या कल्पनेबरहुकूम स्वतःला घडवतो.म्हणजेच इतरांबरोबर माणूस जेव्हा कष्ट करतो तेव्हा हे कष्ट कसे केले जावेत, ते कशासाठी आहेत, थोडक्यात;

आपण एकत्र येऊन जे काय घडवित आहोत ते कशा-प्रकारचे असावे याच्या कल्पना तो स्वतःशी सारख्या बांधीत असतो. माणसाला स्वतःची जाणीव आहे तसेच ही जाणीव आहे याचीही जाणीव त्याला आहे. माणूस जगात वावरत असतो तेव्हा निसर्गात जी अनेकविध सामग्री त्याला आढळते तिच्या मदतीने तो आपले व्यवसाय चालवितो. साहजिकच जगाचे काही एक चित्र तो स्वतःशी तयार करतो. याच वेळी स्वतःसंबंधी, स्वतःच्या गरजा, निकडी वगैरेविषयीही काही चित्र तो स्वतःशी तयार करतो. त्याच्यापाशी अशा प्रकारे दोन चित्रे असतात. एक जगाविषयी त्याच्या ज्या काही कल्पना, समजुती असतात त्याचे एक चित्र व दुसरे स्वतःसंबंधीचे चित्र. स्वतःला काय हवे किंवा काय नको, थोडक्यात माणूस म्हणून त्याच्या ज्या गरजा व अपेक्षा नि आशा आकांक्षा असतात त्यांच्यावर या दोन्ही चित्रांचा प्रभाव चालत असतो. उलट माणसाच्या वैशिष्ठ्यपूर्ण गरजा व आशाआकाक्षांचा प्रभाव त्या चित्रावर होत राहातो. जगाच्या संबंधात माणूस जे चित्र स्वतःशी बाळगतो त्यात निसर्ग किंवा सृष्टीचे चित्र मोडते आणि ज्या समाजात तो वावरत असतो त्या समाजाचे चित्रही मोडते. सृष्टीसंबंधी विचार करण्याची त्याची जी पद्धत असते तिचा परिणाम त्याच्या समाजासंबंधीच्या विचारावर होतो. आणि उलट समाजासंबंधीच्या विचारांचा परिणाम सृष्टीविषयक त्याच्या चित्रावर होतो. सारांश, स्वतःच्या दैनंदिन व इतर गरजा भागविण्यासाठी इतर माणसांच्या मदतीने नैसर्गिक साधनसामुग्रीचा माणूस जेव्हा वापर करतो तेव्हा माणसाच्या म्हणून ज्या काही वैशिष्ठ्यपूर्ण शक्ती असतात त्या विकसित होतात. याच प्रक्रियेत जगासंबंधी व स्वतःसंबंधी काही चित्रे त्याच्यापाशी तयार होतात. त्याच्या गरजा व निकडींचा परिणाम या चित्रांवर होत असतो तर या चित्रांचाही तसाच उलट परिणाम त्याच्या गरजा व निकडींवर होत असतो. सांगायची गोष्ट अशी की समाजामुळे माणूस व माणसामुळे समाज सतत बदलत असतात. समाज व माणूस बदलत असतात म्हणजेच समाजाच्या माणसाबद्दलच्या अपेक्षा व गरजा बदलत असतात तर उलट माणसाच्या समाजाकडच्या अपेक्षा व गरजाही बदलत असतात. या सर्वांचा परिणाम होऊन माणसाचा आचारनितिधर्म घडतो. साहजिकच बाहेरच्या वातावरणाशी तोल सांभाळण्यासाठी या नीतिधर्मात गरजेनुसार बदल घडत असतात. मात्र हे बदल आधी एखादी लोकसमिती नेमून, अथवा सगळ्या प्रकारचा हिशेब करून कोणी घडवून आणित नाही. तर बाह्य वातावरणाच्या रेट्यातून ते आपोआपच तयार होतात व याच अर्थाने हे बदल किंवा हे आचारनीतिधर्मसुद्धा स्वाभाविक असतात असे आपण म्हटले.

कांटच्या प्रतिपादनाचा रोख असा दिसतो की माणसे चांगली किंवा नीतीने का वागतात तर ती विचारी आहेत. स्वतःचा प्रत्येक हेतू तो चिकित्सक विचाराच्या



अनुक्रमणिका

निकषावर घासून पाहातात व तसे करून त्यातील नफ्यातोट्याचा संपूर्ण हिशेब करून कोठलिही कृती करतात. माणसाची विचारशक्ती त्याला तू असे कर वा असे करू नको असे शिकविते. कांटच्या मते माणसाच्या ठिकाणी ही जी सारासारबुद्धी असते ती स्वयंसिद्ध असते. तिचे अस्तित्व सिद्ध करण्याची गरजच नाही. माणूस विचारी असल्याने आपण कोणाचे वाईट केले तर आपलेही तसेच वाईट होण्याची शक्यता आहे हे विचारात घेऊन तो नेहमी वागतो. कांटच्या युक्तिवादाकडे वरवर जर आपण पाहिले तर असे वाटते की कांटचा सारा भर माणसाच्या विचारशक्तीवर आहे. पण वस्तुतः कांटचा सारा भर माणसाच्या ( Practical reason ) वर, त्याच्या व्यवहारीपणावर आहे. माणूस इतरांशी वाईट वागत नाही. कारण इतरही त्याच्याशी तसेच वाईट वागतील ही भीती त्याला वाटते. म्हणजेच माणसाच्या कृतीचा आधार त्याची सारासारबुद्धी असते व ही सारासारबुद्धी ( Instinctively ) किंवा स्वाभाविक प्रवृत्तीप्रमाणे काम करते. म्हणजेच त्या वागण्यात बऱ्याच प्रमाणात भावनांचाही अंश आहे. केवळ तर्काच्याच आधाराने जर आपण परस्परांशी वागत राहिलो तर आपले वागणे अत्यंत शुष्क बनेल. आपले वागणे आपणाला सुखकर वाटते याचे कारण आपल्या वागण्यात भावनांचा ओलावा असतो. आपल्या वागण्यात भावना असतात याचाच अर्थ त्यात ( Instinctive urges ) असतात. सहजप्रवृत्ती असतात. एखादी गोष्ट विचाराला पटली नाही पण भावनाना पटत असेल तर भावनांचे ऐकून आपण ती करतो, हा नेहमीचा अनुभव विचारात घेण्यासारखा आहे.

आपल्या कृतींमागील प्रेरकशक्ती आपल्या भावना आहेत. आपली विचारशक्ती नव्हे. जेव्हा आपल्या हातून एखादी कृती घडते तेव्हा भावनांपोटी ती घडते. तिच्या साधकबाधक तार्किक परिणामांचा विचार आपण मागाहून करतो. भावनानी सांगितले म्हणून कोठलीही कृती आपण करतो. भावनांचा हा वारसा आपणाला पशुसृष्टीतून मिळाला आहे. कारण भावनांचा आधार सुखकारक व दुःखकारक हे विकार असतात. पशुसृष्टीतून माणसाला मिळालेला हा भावनाशक्तीचा वारसा आपण जर त्याच्यापासून काढून घेतला आणि माणसाला जर त्याच्या केवळ तार्किक विचारशक्तीशीच जखडून ठेवले तर आजच्या माणसातून अधिक चांगला व श्रेष्ठ माणूस, प्रत्यक्ष देवदूतच निर्माण होण्याऐवजी सैतान मात्र निर्माण होईल.

कल्पना करा की हैड्रोजन बाँबची चाचणी घेण्याच्या कामगिरीवर एक इसम निघाला आहे. हा इसम हृदयशून्य आहे. त्याला फक्त तार्किक विचार तेवढा करता येतो. माणूस वा माणसाची संस्कृती यापैकी कशातही त्याला आस्था नाही. प्रेम वा आदरही नाही. माणूस मेला काय किंवा जगला काय त्याला त्याचे काही नाही. या हृदयशून्य परंतु अत्यंत बुद्धिमान इसमाला हैड्रोजन

बाँबच्या संभाव्य धोकादायक परिणामांची कल्पना कितीही आगावू दिली तर त्याच्यावर त्याचा काय परिणाम होणार? इष्टानिष्ट, योग्यायोग्य इत्यादी मानवी मूल्यांची जाणच त्याच्यापाशी नसल्याने त्याच्या दृष्टीने त्याच्या प्रयोगाचा निष्कर्ष जितक्या महत्त्वाचा ठरेल तितक्या महत्त्वाची पृथ्वीची सुरक्षितता असणार नाही. चांगल्यावाईटाच्या कल्पनांचाच प्रादुर्भाव त्याच्या ठिकाणी झाला नसल्याने एकदा का सृष्टीची किंमत त्याच्या दृष्टीने नगण्य ठरली आणि तुलनेने प्रयोग महत्त्वाचा ठरला की बाँबची चाचणी एवढा एकच कार्यक्रम त्याच्यापुरता उरतो. गंमत अशी की हायड्रोजन बाँबच्या प्रयोगात अगणित निरपराधांना त्याने यम-यातना दिल्या म्हणून त्याचा धड निषेधही आपण करू शकत नाही. कारण यातना कळण्याइतक्या भावनाच त्याच्यापाशी नाहीत. त्याच्यापाशी बऱ्यावाईटाचे, न्यायान्यायाचे नैतिक निकषच नाहीत.

माणूस केवळ तर्कशुद्ध बुद्धीवरच जगत नसतो. दोन पर्यायात आपण जेव्हा निवड करतो तेव्हा ती निवड तार्किक बुद्धींच्याच फक्त कसोटीवर आपण करीत नाही. या निवडीमागे मूल्यांची एक अबोध जाण असते. या मूल्यांच्या जाणीवेमुळे एखादी कृती आपणास इष्ट व व्यवहार्य वाटते तर दुसरी अनिष्ट व त्याज्य वाटते. मूल्ये भावनांतून सिद्ध होतात. मूल्यांच्या मागची शक्ती ही भावनांची शक्ती असते. विचार हे पृथक्करण करण्याचे शस्त्र आहे. समोरच्या प्रश्नाची चिरफाड करून त्याच्यासंबंधी निष्कर्ष देण्याचे काम विचार करतात. पण त्या निष्कर्षाप्रमाणे कृती घडून येण्यासाठी त्या निष्कर्षांना भावनांचे पाठबळ मिळावे लागते. तरच विचारांचे रूपांतर कृतीत घडून येणे शक्य असते. भावना ही कोठल्याही कृती-मागील प्रेरक कार्यशक्ती आहे. म्हणजे आपल्या ज्या उपजतवृत्ती आहेत त्या ही प्रेरकशक्ती आहेत. सत्यासत्य, नीतीअनिती, इष्टानिष्ट, श्रेयाश्रेय यातील निवड बुद्धी करू शकेल. परंतु त्या निवडीला कृतीची जोड मिळण्यासाठी आपल्या भावना त्या निवडीच्या बाजूने उत्तेजित व्हाव्या लागतील. भावना प्रक्षोभित झाल्या तर अन्याय, असत्य, अश्रेय, अनीती यांच्या बाजूनेही एखादा भला माणूस उभा राहू शकतो. विचारयंत्राला जर भावनायंत्राची साथ मिळू शकली नाही तर विचारयंत्र हे एक केवळ गणकयंत्रच उरते. ते फक्त चारीबाजूंचा हिशेब करील. पण हा हिशेब केला जाण्यासाठीसुद्धा योग्य ती माहिती त्या गणकयंत्राला भरवावीच लागते. जर ही माहिती त्या यंत्राला मिळाली नाही तर तेही काम ते करणार नाही आणि त्याने काम केलेच तर ते चुकीचे असेल. आपल्या विचार-यंत्राची रचना अत्यंत गुंतागुंतीची असली आणि ते यंत्र फार वरच्या दर्जाचे असले तरी माणसाला कार्य करावयास लावील अशी प्रेरकशक्ती त्या यंत्रापाशी नाही. ही प्रेरकशक्ती Instinctive behaviour mechanism मधून, वागण्याची जी एक पद्धती जन्मतःच आपल्या ठिकाणी आपण घेऊन आलेलो असतो त्या उपजत

वर्तनतंत्रामधून येते. ही यंत्रणा अगदी प्राचीन आहे. तिच्या तुलनेत विचारयंत्रणा ही एक अलिकडची वाढ आहे. माणसाच्या ठिकाणचा भावनिक जिव्हाळा, सौंदर्यानंद, कलात्मक सर्जन, शास्त्रीय ज्ञानसंपादनामागील सदा अतृप्त असणारी त्याची जिज्ञासावृत्ती, माणसातली प्रेमवृत्ती या सर्वांचा आधार म्हणजे ही उपजत वर्तन-यंत्रणा. व्यक्तिमत्वातील गतीशील अंतःप्रवाहांच्या दृष्टीने पाहिल्यास मनुष्य आणि पशू या दोहोत तसा कोठलाच फरक नाही. हे अंतस्थ प्रवाह दोघांच्याही ठिकाणी एकाच प्रकारे कार्य करतात. सहजप्रवृत्तींच्या याच आंतरिक गतीशील प्रेरणांच्या भक्कम आधाराने आपले आचारनीतीधर्म व सामाजिक संकेत तयार झालेले असतात. पशुंच्या बाबतीत परस्परांबरोबर वागण्याच्या संकेताच्या स्वरूपात हा नीतीधर्म दिसतो. उदा. कुत्र्यांच्या झुंजीत जेव्हा एक कुत्रा हरतो तेव्हा हरलेला कुत्रा शेपटी मागल्या दोन पायात घालून 'कुंई, कुंई' असा केविलवाणा आवाज काढतो; किंवा आपला गडदाच दुसऱ्या कुत्र्याच्या पुढे करून '-घे, जर चावाच घ्यायचा असेल घे माझ्य. मानेचा चावा, मी काहीही करणार नाही असेच जणू सुचवितो. हे सर्व अविर्भाव म्हणजे शरणागती पत्करल्याच्या प्रतिका-त्मक सांकेतिक खुणा होत. या खुणा करून पराभूत कुत्रा आपण हरलो याची अप्रत्यक्ष कबुलीच देत असतो. आता विजयी कुत्र्याला त्यावरचा हल्ला पुढे चालू ठेवता येत नाही. कारण आपण हरलो अशी निशाणी दिली गेली की जिंकणाऱ्या कुत्र्याने भांडण थांबविले पाहिजे असा कुत्र्यांच्या जगातला संकेत आहे. हे संकेत कुत्र्याच्या वंशेतिहासात उत्क्रमित झाले. असून त्याना अज्ञात आज्ञांचे स्वरूप आले आहे. असे अनेक आचारसंकेत प्रत्येक पशू-प्रजातीत उत्क्रमित व स्थिर झाल्याचे दिसून येते. माणसामध्ये जे नीतीसंकेत व आचारसंकेत आढळतात ते देखील याच नमुन्याचे आहेत. हे संकेतदेखिल माणसाच्या वांशिक उत्क्रांतीक्रमात व सांस्कृतिक प्रक्रियेत तयार होत गेले आहेत. हे आचारसंकेत Behaviour patterns व्यक्तींच्या जीवनात प्रेरकशक्तींचे ( motives ) कार्य करतात. हे संकेत म्हणजे त्या त्या समाजातील जीवनमूल्येच होत. समाज स्वतःच्या कृतींसाठी जे मार्गदर्शन घेतो ते तो या मूल्ययंत्रणेतून, आचारसंकेतातून घेत असतो. कृतीसाठी आवश्यक ती कार्यशक्तीसुद्धा याच यंत्रणेच्या द्वारा मिळते. तथापी या सगळ्या गोष्टी खऱ्या असल्या तरी या संकेतांची ( जीवनमूल्यांची ) आंतरिक प्राकृतिक रचना कशी आहे हे आजही आपणास माहीत नाही. मात्र ही माहिती आपण अवगत करून घेतली पाहिजे हेही तितकेच खरे आहे. कारण मानवी आयुष्याचे मार्गदर्शन करणारे आचारसंकेत कसे तयार होतात, त्यांची एकूण कार्यपद्धती कोठल्या प्रकारची आहे. त्याना प्रेरकशक्ती कोठून मिळते, आचारसंकेतांच्या कार्यपद्धतीत बिघाड घडून येतो तेव्हा नेमके काय घडते, असे बिघाड कसे दुरुस्त करता येतील इत्यादि माहिती मिळविण्यात आपणाला जर यश आले तर माणसाला पाशवी

आक्रमकप्रवृत्तींच्या आहारी जाण्यापासून बचावण्यासाठी काही प्रयत्न करता येतील, आचारसंकेत किंवा जीवनमूल्ये यांचा उगम मनुष्याच्या Biology त, त्याच्या शरिरव्यवस्थेत आहे यात शंका नाही. जर हे कसे घडते याचे ज्ञान आपणास झाले तर नव्या वातावरणाला साजेसे आचारसंकेत वा जीवनमूल्ये माणसाच्या ठिकाणी आपण तयार करू शकू.

ज्या दिवशी पाषाणापासून आपण हत्यारे बनवू शकतो व या हत्याराच्या साहाय्याने आपल्या शत्रूचा फडशा पाडू शकतो ही गोष्ट माणसाला उमगली त्याच दिवशी अखिल मानवजातीचा विनाश होण्याची वेळ आली होती. परंतु मानवजातीच्या सुदैवाने त्याच वेळी मरणाधिनतेच्या भयानकतेचाही अनुभव माणसाला आला आणि एक प्रकारच्या नैतिकतेचा उदय त्याच्या हृदयात होऊन तो विनाशप्रसंग टळला. दोनच क्षणापूर्वी जो आपला प्रिय माणूस आपणाबरोबर हासत-बागडत होता तोच दोन क्षणानंतर हालचाल करायचा थांबला या आकस्मिक घट-नेचा पहिला मानसिक धक्का जेव्हा आदिम मानवाला बसला तेव्हा त्या धक्क्या-बरोबरच त्याच्या मनात कोठलातरी प्रचंड मानसिक कोलाहल माजला असणार. मृत्यूच्या धक्क्याबरोबरच जिवंत असण्याचे महत्व त्याच्या मनात निर्माण झाले असावे व बेजबाबदार हत्या करण्यापासून तो वंचित झाला असावा. आदि-मानवाला मृत्यूच्या घटनेचा धक्का बसला असेल हे विधान अनेकाना कदाचित अतिशयोक्तीचे वाटेल. परंतु मनुष्यच नव्हे तर कित्येक पशू आणि पक्षी यानाही मृत्यूचा अर्थ कळू शकतो असे शास्त्रज्ञाना त्यांच्या निरिक्षणात आढळून आले आहे. विशेषतः समूह करून राहणाऱ्या प्राण्याना तर हा अर्थ निश्चितच समजत असला पाहिजे. हत्तींच्या कळपातील एखादा हत्ती जर अकस्मात मरून पडला तर इतर हत्ती त्याच्या अंगावर झाडांच्या कोवळ्या डहाळ्या वगैरे टाकून त्याचे शरीर झाकू पाहतात. ग्रेलॅग हंसाला त्याचा साथीदार आसन्नमरण अवस्थेत पडल्याचे दिसून आल्यास ग्रेलॅग हंस आपला पिसारा उभारून त्याच्या भोवती त्या पिसाऱ्याची छाया करताना दिसतो. तसेच त्याला जखमी करणाऱ्या अदृश्य शत्रूवर रागाचे फुत्कार टाकतानाही तो दिसतो. काही वर्षांमागे म्युनिच पशुसंग्रहालयात प्राण्याच्या मित्रप्रेमाची लोकविलक्षण घटना घडून आली होती. खेळताना अपघाताने एका हत्तीकडून त्याचा आवडता माहुत जबर जखमी झाला होता. आपला मित्र प्राण-संकटात असल्याचे त्या हत्तीला जाणवले मात्र तो हत्ती त्या माहुतावर आपल्या शरिराची ढाल करून उभा राहिला व पशुसंग्रहालयाच्या कोणाही नोकरास स्वतःच्या जवळ तो येऊ देईना. आपणच त्याला जखमी केले आहे हे मात्र हत्तीच्या ध्यानात शेवटपर्यंत आले नाही. हत्ती मित्रापासून बाजूला हटेना व औषधी उपचार करण्यासाठी त्याला इस्पितळात नेऊ देईना. हत्तीच्या प्रेमापायी त्या माहुताचा प्राण जाण्याची वेळ त्या प्रसंगी आली होती.



अनुक्रमणिका

सारांश, मृत्यूच्या भयानकतेची कल्पना आदिमानवाला येऊन बेजबाबदार मनुष्यहत्तेपासून तो दूर राहिला ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. कारण माणसांनी एकमेकांना मारून स्वतःची जात संपवून न टाकण्यासारखे या व्यतिरिक्त दुसरे कोठलेच कारण दिसत नाही. त्याच्या उलट मृत्यू म्हणजे या आयुष्याचा शेवट नव्हे, मृत्यूनंतरही मनुष्याला आयुष्य आहे अशा प्रकारच्या समजूती मनुष्य-जमातीत असल्याचा पुरावा पुरातत्वशास्त्रज्ञाना मिळाला आहे. आदिमकाळी रानटी मानव जेव्हा मेलेले माणूस पुरीत असे तेव्हा तो ते गर्भावस्थेत मनुष्याचे शरिर जसे असते तसे हातपाय जवळ घेतलेल्या व मुटकुळी केलेल्या अवस्थेत पुरीत असे. जणू काही यापुढे ते माणूस नवा जन्म घेणार आहे असेच त्याला त्यातून सूचित करावयाचे असे. त्याची सगळी हत्यारे, त्याची भांडीही त्याच्यावरोबर तो ठेवित असे. त्याच्याभोवती पिंजरीसारखा लाल रंग पसरीत असे. लाल रंग म्हणजे त्याच्या दृष्टीने रक्त होते. मृत्यूचा धक्का बसला नसता तर मृत्यूची भीती कमी करण्यासाठी माणसाने हे प्रतीकात्मक प्रयत्न केले नसते. असो. तर मृत्यूच्या घटनेचे गांभीर्य मनावर बिंबल्यामुळेच आदिमानव भाईबंदांच्या अविचारी कत्तली-पासून दूर राहिला. म्हणजेच त्याच्या ठिकाणी एक प्रकारच्या नैतिक भावनेचा उदय झाला. ही नैतिक भावना कदाचित अतिशय कमकुवत असेल परंतु ती नैतिक होती यात मात्र शंकाच नाही. कारण तीत आपल्यासारख्याच दुसऱ्या प्राण्याच्या हिताहिताचा, सुखदुःखाचा विचार अभिप्रेत होता. आदिम मानवाच्या हातून मानवजात बचावण्याचे आणखी एक कारण म्हणजे त्या काळातली लढाईची हत्यारे इतकी ओबडधोबड व तकलादू होती की त्यानी जरी माणूस जखमी होऊ शकत होता तरी मरू शकत नव्हता. म्हणून दुसऱ्या मनुष्याचा जीव उगाचच घेऊ नये या प्रकारची भावना जेव्हा आदिमानवाच्या मनात निर्माण झाली तेव्हा त्या भावनेप्रमाणे वागण्यासाठी त्याला फारसे मानसिक प्रयास निश्चितच पडले नसणार. कारण दुसऱ्याला ठार मारण्याची त्याची क्षमताच त्यावेळी अगदी अत्यल्प होती.

क्रो–मॅग्नन माणसाला आजच्या मानवाचा पूर्वज मानण्यात येते. कारण क्रो–मॅग्नन माणसाच्या मेंदूचे वजन आजच्या मानवाच्या मेंदूच्या वजनापेक्षाही अधिक होते. मेंदूच्या सारखेपणावर निष्कर्ष काढायचा झाल्यास असे म्हणता येईल की क्रो-मॅग्नन आणि आजच्या मानवाच्या सहज व नैसर्गिक प्रेरणा एक-मार्गाच्याच असल्या पाहिजे. आज मध्य न्यू गिनियातल्या पापुअन समाजामध्ये ज्या प्रकारची समाजव्यवस्था आढळते तशाच प्रकारची समाजव्यवस्था त्या काळातल्या क्रो–मॅग्नन मानवात प्रचलित होती आणि तशीच टोळधाटोळचांची आपापसातील युद्धेही !



अनुक्रमणिका

क्रोमॅग्नन मानवाच्या एकूण जीवनपद्धतीवरून आजच्या मानवाच्या नैसर्गिक प्रवृत्तीविषयी काही कयास बांधता येतील असे वाटते. कारण या प्रवृत्तींचा उगम तेव्हाच्या परिस्थितीत व त्या परिस्थितीशी जमवून घेण्यासाठी तेव्हाच्या मानवाने ज्या खटपटी केल्या होत्या त्यात झाला आहे. कारण ढोबळ स्वरूपात याच प्रवृत्ती पाषाणयुगीन मानवाच्या ठिकाणीही आढळतात. पाषाणयुगीन मानवाच्या जीवनाचे एक काल्पनिक चित्र आपण आपल्या मनासमोर रेखाटू. त्या काळातले सामाजिक जीवन टोळ्याटोळ्यात विखुरलेले होते. हे जीवन अतिशय कष्टदायक व धोक्याचे होते. एकेका टोळीत डझनभर पुरुष व तितक्याच स्त्रीया नि मुले असत. या टोळ्या आपसात सतत झगडत, लढत असतील हे अगदी उघड आहे. परंतु केवळ याच कारणामुळे प्रत्येक टोळीतली पुरुषमंडळी व इतरही परस्परांशी घट्ट बांधलेली असली पाहिजेत. कारण टोळीतले पुरुष किती एकजूटीने वागू शकत यावरच त्या टोळीचे भवितव्य अवलंबून असे. अर्थात एकत्र कुटुंब-पद्धतीत ज्याप्रमाणे एकमेकात भांडणे व बारिकसारीक कुरबुरी असतात तशा त्या याही टोळ्यात असतील. कधी स्त्रीयांवरील मालकीहक्काच्या. कधी इतर काही कारणापायी. तथापी टोळीतल्या मंडळींच्या आपापसातल्या स्पर्धा व भांडणाना टोळीच्या जीवनात निश्चितच दुय्यम स्थान असेल. कारण इतर टोळ्यांपासून स्वतःच्या टोळीचे संरक्षण हाच मोठा कार्यक्रम त्यांच्यापुढे होता. स्वतःच्या टोळीतल्या लोकांचे इतर टोळकऱ्यांपासून संरक्षण व शक्य तेव्हा इतर टोळीतल्या बायकामुलांची लूट या दोन कामात तेव्हाच्या टोळ्या व्यग्र असतील. पण याच कारणाने टोळीतल्या घटकात दृढ एकजूट असली पाहिजे. कारण टोळीतल्या प्रत्येकाने कळायला लागल्यापासून एकमेकाच्या खांद्याला खांदा भिडवून लढाया केल्या असतील. अनेकदा त्यांनी एकमेकाना वाचविले असेल. आक्रमकपणाचा थोडा रोख बाहेरच्यांकडे असतो तर थोडा आतल्यांच्याकडे हे वर आपण पाहिलेच. आपण ज्या काळाचा विचार करीत आहोत त्या काळात अनेक वेगवेगळ्या टोळ्या अस्तित्वात असल्याने जातीविशिष्ट आक्रमणाला तेव्हा उधाणच आले असणार. मनातला राग ज्यांच्यावर काढावा अशा अनेक टोळ्या आजूबाजूला वावरत असल्याने टोळकऱ्यांची आपापसातील भांडणे त्या मानाने कमीच असतील. या सर्व गोष्टींचा एकत्रित विचार करता असे म्हणता येईल की तेव्हाच्या टोळ्या या आताच्या सैनिकी पलटणींसारख्या वागत, जगत होत्या. टोळकरी एकमेकांशी निष्ठेने बांधलेले असतील. प्रसंग पडल्यास सहकाऱ्यासाठी प्राणही देण्याची त्यांची तयारी असेल. हे वातावरण अर्थात असाधारण असेच म्हणावे लागेल. तुम्ही आम्ही या वातावरणात राहात नसतो. पण युद्धात गुंतलेले सैनिक मात्र सतत याच प्रकारच्या मनावर दडपण आणणाऱ्या वातावरणात राहात असतात. क्रोमॅग्नन टोळ्याही तशाच वातावरणात राहात होत्या. शत्रूची टोळी केव्हा हल्ला



अनुक्रमणिका

करील आणि कधी हातघाईच्या लढाईत भाग घ्यावा लागेल हे त्यांना सांगता येत नसे. म्हणून ते नेहमीच लढाईच्या पवित्र्यात असत. या प्रकारच्या एकांतिक परिस्थितीत व्यक्तींच्या हातून लोकोत्तर पराक्रमाची, व धैर्याची, आत्मत्याग व बलिदानाची कृत्ये सहज घडत असतात. त्यामुळे सहजच या प्रकारची मूल्ये तत्कालिन माणसाच्या मनात दृढावत गेली. आणखी असे की लढाईसारख्या शत्रूचा जीव घेण्याच्या व स्वतःचा जीव देण्याच्या कार्यक्रमात शौर्यधैर्यत्यागादी गुणांचा अविष्कार जितक्या सहजतेने होऊ शकतो तितका तो शांततेच्या काळात होत नाही. पाषाणयुगात सततच लढाईचा कार्यक्रम चालू असल्याने वर उल्लेखिले ते गुण तत्कालिन माणसाच्या अंगात चांगलेच बाणले असले पाहिजेत. माणसाच्या मनात जो स्वाभाविक आक्रमकपणा असतो त्या आक्रमकपणासाठी बाहेरील शत्रूचे खाद्य यथास्थित मिळत राहिल्याने टोळीतल्या लोकात त्या मानाने आकस, परस्परद्वेष वगैरे नकारात्मक भावना फारशा तीव्र राहात नव्हत्या. स्वबांधवा-बद्दलची आत्मियता, मित्रनिष्ठा वगैरे गुणधर्मांचा पाया याच काळात घातला गेला असला पाहिजे. हेच गुणधर्म पुढे सामाजिक संकेत बनले आणि कालांतराने त्या संकेतांचे रूपांतर स्वाभाविक वर्तनात घडून आले.

जी कृती गरजेपोटी का होईना पण परत परत आपणास करावी लागते ती पुढे आपल्या सवयीची बनून समान परिस्थिती उद्भवताच आपणाकडून स्वाभाविक-पणेही घडू लागते. म्हणजेच प्रथम मुद्दाम प्रयत्नपूर्वक केलेल्या वर्तनाचे रूपांतर नैसर्गिक वर्तनात घडून येते. आजचा माणूस अनेक संकटांच्याही प्रसंगी न डगमगता खंबीरपणे उभा राहतो याचे श्रेय गेल्या अगणित वर्षातल्या वर म्हटल्या त्या त्याच्या वर्तनाला आहे. जे वर्तन पाषाणयुगातल्या मानवाने प्रयत्नपूर्वक स्वतःच्या अंगी बाणविले त्याचीच गोड फळे आपण चाखत आहोत. पाषाणयुगातला मानव संकटात सापडलेल्या मित्रासाठी प्राण द्यावयाची तयारी दाखवित होता. आज अनोळखी इसमासाठीही आपण प्राणसंकटात उडी घेतो. या दोन्ही वर्तनांचा उगम एकाच प्रकारच्या भावनेत आहे. सहानुभूती हे त्या भावनेचे नाव होय. पाषाणयुगीन मानव मित्रासाठी जीव धोक्यात घालावयास तयार असे. आज आपण कोणासाठीही ते करतो. पाषाणयुगात मानवी वर्तनाचा जो आदर्श घातला गेला त्याचाच संकेत बनून तो स्वभाव बनला. प्रत्येक समाजाची स्वतःची अशी Hero system असते. म्हणजे मोठेपणाच्या लक्षणाची रीत असते. त्या समाजातील प्रत्येक घटक त्याला जमेल त्या प्रकारे या मोठेपणाचे अनुकरण करू पाहतो. या 'हिरो-सिस्टिम्स' केवळ शाब्दिक संकेत नसतात. त्या प्रत्यक्ष वर्तनाकृती असतात. संकेतांचे रूपांतर शारिरीक प्रतिक्रियात तेथे घडून गेलेले असते. कारण संकेतांचे पालन व अनुकरण करण्यात हजारो वर्षे वेस्थाने संकेत, सवयी व मनाची वळणे बनलेले असतात.

आज एक माणूस दुसऱ्यासाठी स्वतः होऊन धडपडतो याचे कारण माणूस विचारी असल्याने आपल्या सारख्या दिसणाऱ्या दुसऱ्या प्राण्याना आपण मदत केली पाहिजे असे त्याला वाटते हे नसून हजारो वर्षे त्याच्या अंगवळणी त्या सवयी पडल्याने तो तसे करतो हे आहे. माणूस विचार करू शकत असल्याने स्वतःसारख्या इतर माणसाचे दुःख तो कल्पनेने जाणू शकतो व म्हणून सहानुभूतीपूर्वक विचार करून संकटात सापडलेल्या माणसाच्या साहाय्याला तो धावून जातो हे कांट यांचे मत कितीही तर्कशुद्ध वाटले तरी त्याला जीवशास्त्राचा आधार नाही. माणसे एकमेकाला मदतीचा हात देतात हे कांट यांचे निरिक्षण बरोबर आहे. पण माणसाना विचार करता येत असल्याने त्याना इतरांविषयी सहानुभूती वाटून ती हे करतात हे कांट यांचे मत बरोबर नाही. कारण जिव्हाळ्यापोटी माणसे तसे करतात तो जिव्हाळा त्याना विचाराने शिकविलेला नसून त्यांच्या भावनानी, त्यांच्या शरिराने शिकविलेला आहे. हा जिव्हाळा हा एक सामाजिक आदर्श आहे. आणि उत्क्रांती प्रक्रियेच्या हजारो वर्षांच्या कालखंडात मनुष्याच्या अंगात तो रुजला आहे. मनुष्याच्या वंशेतिहासाची ती फलनिष्पत्ती होय.

क्रोमॅग्नन मानवाला आक्रमक आणि प्रेमळ अशा दोन्ही प्रकारच्या भावनाना सारख्याच मोकळेपणाने प्रकट करता येत होते. अंगातली रग जिरविता येण्याइतके शत्रू त्याला होते आणि जीवाभावाने प्रेम करावे इतके मित्रही त्याला होते. म्हणजे लढण्याची त्याची हौस भागत होती आणि उत्कट प्रेम करण्याचीही त्याची भूक भागत होती. मानववंशाच्या उत्क्रांतीक्रमात सहज प्रेरणांच्या रूपात या दोन भावना दृढ झाल्या होत्या. क्रोमॅग्नन मानवाला अशा प्रकारे त्याचा नैसर्गिक स्वभाव विनासायास व्यक्त करता येत होता आणि त्या नैसर्गिक प्रवृत्तीवर फाजील ताणही पडत नव्हता. त्याला त्याच्या मीत्राशी चांगले वागावे लागत होते. म्हणजेच त्याच्या ठिकाणी अल्पशी का होईना नैतिक भावना उत्पन्न होत होती. पण तत्कालिन परिस्थितीच अशी होती की ही नैतिक भावना वाजवीपेक्षा अधिक ताणलीच जाऊ शकत नव्हती. त्याला मित्र होते तसे शत्रूही होते. त्यामुळे त्याच्या मूळ प्रेमळ–आक्रमक अशा दुहेरी भावनेला योग्य तो वाव मिळत होता. मनुष्याची कोठलिही भावना एकेरी स्वरूपाची नसते. जेथे प्रेम असते तेथेच प्रेमाची उलट बाजू जो द्वेष तो द्वेषही आढळतो. क्रोमॅग्नन मानवाला हा द्वेष काढण्यासाठी शत्रूपक्षीय टोळ्यातले इतर लोक असल्याने मनात साचणारा द्वेष आप्तस्वकियांवर काढण्याची गरजच त्याला भासत नव्हती. आता त्या काळातली सामाजिक परिस्थिती आणि आजच्या काळातली सामाजिक परिस्थिती यांची तुलना करून पाहा बरे ! आपल्या ठिकाणी आज जी ईर्षा व आक्रमक जोष आढळतो तो उत्क्रांतीक्रमात आणि इतिहासक्रमात तसा तयार झाला आहे. आपल्या ईर्षेला व जोषाला त्या वेळी कार्यही होते. पण आता ते कार्य राहिलेले नाही. मग या आक्रमकपणाचे

आपण काय करू शकतो ? आज सगळीकडे मोठमोठी औद्योगिक शहरे दृष्टीस पडतात. या शहरातून माणसांचे लोंढेच्या लोंढे वावरताना दिसतात. साहजिकच अति गर्दीमुळे माणसाला माणसाची जी एक स्वाभाविक उबग येते तशी उबग या लोकांना एकमेकांबद्दल वाटत असणार. पण त्यावर काहीच इलाज ते करू शकत नाहीत. माणसाची आक्रमकता जेवढी आहे तेवढा त्याचा प्रेमळपणा असत नाही. प्रेम आपण फारच थोड्यांवर करू शकतो. द्वेष कितीही जणांचा करू शकतो. प्रेम करण्याची माणसाची शक्ती अत्यंत मर्यादित आहे. जगात अनेकजणांशी आपण ओळख करू शकू. पण त्यातील फारच थोड्यावर आपणाला प्रेम करता येईल. म्हणूनच दर दिवशी या ना त्या कारणाने जो राग आपल्या मनात साचत जाईल त्याचा निचरा होण्यासाठी काही वाव नाही आणि परत आपल्या ठिकाणची वैफल्य मात्र वाढत जाणार असा हा आधुनिक जीवनाचा गुंता आहे. हा गुंता काही केले तरी सुटण्यासारखा नाही. फार छोट्या जागेत माणसे जेव्हा गर्दी करून राहू लागतात तेव्हा त्यांच्यातील परस्पर स्नेहभावनेला ओहोटी लागते. ही तर सर्वांच्याच पाहाण्यातली गोष्ट आहे. गर्दीत राहणारी माणसे चिडकी बनतात. मोठमोठ्या औद्योगिक शहरातून वस्ती करून राहणाऱ्या लोकांना सामाजिक शिष्टाचाराचा किती उबग वाटत असेल हे तुम्ही आम्हीही स्वतःच्या अनुभवावरून सांगू शकू. शहरी मनुष्याला कोणाला भेटणं नको आणि कोणाशी संबंध नको असेच वाटत असणार

माणसाच्या आक्रमकतेची एकूण शक्ती व मर्यादा काय ते आताच आपण पाहिले. आपलेपणाच्या विरुद्ध आक्रमकपणा. आधुनिक समाजात आक्रमकपणाला बर समाजसंमत एकही मार्ग नाही. प्रत्यक्ष सोडाच पण शब्दात देखिल आक्रमकता दिसता नये असे आजचा शिष्टाचार सांगतो. प्राचीन काळी संताप ज्याच्यावर काढावा असा शत्रू अगदी शाराशी नसला तरी गावच्या वेशीशी निश्चितच उपलब्ध होता. आज इतक्या जवळ शत्रू सापडत नाही. शत्रू आज हवाच झाला तर पार देशाच्या बाहेर परक्या राष्ट्रात तो शोधावा लागतो. पोलादी पडद्यांआड, बांबूच्या भिंतीआड. ज्याच्यावर राग काढावा असा शत्रू आज उपलब्ध नसल्याने आजच्या माणसाची फार मोठी मानसिक कुचंबणा होत आहे. कारण संताप आवश्य असल्याने आपल्या पूर्वजांनी संतापाची प्रतिक्रिया आत्मसात केली. वेळोवेळी सतपाणी घालून वाढविली. स्वतःच्या 'हिरो-सिस्टिममध्ये' तिला स्थान दिले. आता मजा ही आहे की वांशिक उत्क्रांतीप्रक्रियेत जे जे अनेक गुणविशेष आपण जमा केले आहेत त्यात एकही गुणविशेष असा नाही की जो आवाक्यात राखण्यासाठी नैतिक दबाव वापरावा लागत नाही. म्हणजेच हे गुणविशेष केव्हाही मर्यादाबाहेर जाऊ शकतात. प्रयत्नपूर्वक त्याना दाबून ठेवावे लागत. ही एकूण परिस्थिती बोचणारी असते. प्रत्येक संस्कृती व समाजात त्याग





आणि विरक्ततेचे तत्वज्ञान शिकविण्यात येते त्याचे रहस्य वरील वस्तुस्थितीत आहे. काहीही करा पण स्वतःचे आवेग काबूत राखा असे ही तत्वज्ञाने सांगतात. आच आपल्या अनेक कृत्यांना आपण अयोग्य हे विशेषणं लावतो तर मनुष्य-हत्तेसारख्या काहीना चक्क पापच समजतो. पण संस्कृतींच्या वाटचालीत केव्हातरी ही कृत्ये योग्य नव्हे तर अत्यावश्यक होती हे विसरून चालणार नाही. एखाद्याने जर आधाशीपणा दाखविला तर त्याला आपण आज हासतो. पण खूप खूप वर्षामागें, पाषाणयुगात 'माणसाला जेव्हा क्वचितच पोटभर अन्न मिळत असे तेव्हा खाण्याचो संधी मिळताच पोटाला तडस लागेपर्यंत खाऊन घ्या असेच कोणीही केले असते. साठीसामाशी जेव्हा एखादे अजस्त्र जनावर या लोकांच्या हाती लागे तेव्हा प्रत्येकजण पोट फुटेस्तवर त्या मांसावर ताव मारून घेई. अर्थात त्या काळात तसेच वागणे आवश्यक होते. खादाडपणा हा तेव्हा दुर्गूण नव्हता तर जीव जगवून धरण्याची ती एक नामी कल्पनाच होती. आज आपण म्हणतो की अति खाण्याने माणूस मंद आणि विषयलंपट बनतो. पण ज्य काळासंबंधी आपण बोलत आहोत त्या काळी अति खाण्याचे प्रसंग अगदीच क्वचित असत. तेव्हा या लोकांचे अति खाणे म्हणजे आधाशीपणा नव्हता आणि स्वार्थीपणाही नव्हता. त्यांची सगळी दौलत काय ती थोडे रंगीबेरंगी दगड पक्ष्यांची पिसे नि आजच्याच जेवणातून उद्याकरिता राखून ठेवलेली फळे व कंदमुळे. या साठवणीचे रूपांतर मालमत्तेत होण्याची व माणसे स्वार्थी, आपमतलबी व कंजूष बनण्याची शक्यताच तेव्हाच्या माणसांच्या बाबतीत नव्हती, पाषाणयुगीन माणसाला दारू बनविता येत नव्हती. त्यामुळे दारूची झींग काय हे देखिल त्याला माहित नव्हते. त्याची सगळी शक्ती नि वेळ हातातोंडाची गाठ जमवण्यातच खर्च होत असे. रंगढंग करायला त्याच्यापाशी फुरसद नव्हती आणि रगही नव्हती. अगदीच मोजके शब्द आणि त्याहूनही मोजक्या कल्पना त्याला अवगत असल्याने आजच्या माणसाप्रमाणे स्वतःच्या भावी जीवनाचे सुखी आनंदी असे एखादे भव्यचित्र त्याला रंगविता येत नव्हते. ज्याला आपण काल्पनिक विश्व म्हणू अशा काल्पनिक विश्वात त्याला रंगता आले नसते. थोडक्यात असे म्हणता येईल की ज्याला आपण मानसिक संघर्ष म्हणू असे संघर्षच त्याच्या बाबतीत शक्य नव्हते. वंशविकासात अंगवळणी पडत गेलेली स्वभाववळणे, सहजप्रवृत्तींसदृश वर्तने आणि सामुदायिक आयुष्यक्रमापायी आवश्यक होऊन बसलेल्या नैतिक गरजा यात फारशी खेचाखेच नसल्याने जो काही थोडाबहुत मानसिक ताण तेव्हाच्या माणसाला सहन करावा लागे तो तो सहज निभावून नेऊ शके. आजच्या माणसाचे आयुष्य त्या मानाने भलतेच कॉम्प्लेक्स आहे. त्याच्या स्वभावातील मित्रत्वभावना आणि त्याची आक्रमकता या दोन्हीही मनोविकारावर आज असह्य ताण पडतो. अनेक प्रकारे माणसाची आज फरफट



अनुक्रमणिका



होत आहे. आजच्या माणसाला अनेक प्रकारच्या परस्परविरोधी नैतिक प्रश्नांना तोंड द्यावे लागते. तो प्रश्न क्रोमॅग्नन माणसाला नव्हता. त्याला फक्त एकच नैतिक आदेश पाळावा लागत होता. " तुला तुझ्या शेजाऱ्याचा केवढाही संताप येवो, कृपा करून त्याच्या डोक्यात कुऱ्हाडीचा दांडा हाणण्यापासून तू परावृत्त हो. " एवढा आदेश अर्थात तेव्हाचा माणूस पाळू शकत होता.

आता आजच्या काळाचा विचार केला तर असे दिसून येईल की आदिम मानवाच्या तुलनेत आजच्या मानवाला फारच तीव्र अशा प्रकारच्या नैतिक संघर्षांना तोंड द्यावे लागत आहे. एकिकडे कारण असतानाही त्याला कोणाचा राग करू दिले जात नाही. तर दुसरीकडे माणसाने माणसावर फक्त प्रेमच करावे,' शत्रूवर देखिल प्रेम करावे,' 'कोणी कोणाचा द्वेष करता कामा नये' या प्रकारची शिकवणूक त्याच्या कानीकपाळी ओरडण्यात येते. मात्र 'कोणी कोणाचा द्वेष करू नये, सर्वांनी प्रेमाने वागावे' असे जरी कितीही कोणी सांगितले तरी प्रेमाबरोबरच द्वेषाचीही भावना माणसाच्या अंगी असल्याने थोडाबहुतपर द्वेष मानवसुलभच आहे. द्वेष, विरोध, आक्रमकता हा माणसाचा नैसर्गिक स्वभावच असून वंशेतिहासातून त्याने तो स्वत:बरोबर आणला आहे. तथापी माणसाने काही केले तरी त्याच्या या स्वभावाला आज वाव मिळणे शक्य नाही. सामाजिक जीवनाने आज वेगळे वळण घेतले आहे. हे वळण मनुष्याच्या ठिकाणी जी स्वभाव वळणे उत्क्रमित झाली आहेत त्यांच्याशी सुसंगत नाही. तव्हा एकीकडे वंशेतिहासात तयार झालेला त्याचा विवक्षित स्वभाव आणि नव्या संस्कृतीच्या नव्या गरजा व अपेक्षा या दोहोंच्या रस्सीखेचीतून आजच्या माणसाला वाट काढावी लागते. गेल्या हजारो वर्षांत मानवी स्वभावाने जे नैसर्गिक वळण घेऊन ठेवले आहे त्या वळणापासून आपण खूपच दूर आलो आहोत. आपणाला कितीही संताप झाला तरी विध्वंसनाने आपण तो शमवू शकत नाही. सामाजिक संकेत आपल्या आड येतात. तेव्हा संतापाने आपण अस्वस्थ झालो तरी चेहऱ्यावर आपणाला हासू दाखवावे लागते. मनाच्या नैसर्गिक वळणापासून आपण दूर आलो आहोत याचा अर्थ आपल्या नैसर्गिक प्रवृत्तींवर विवेकाचा अंमल जारी करण्यासाठी आपण आज झटत आहोत. याचाच शेवटी अर्थ असा की आपल्या प्रवृत्ती आणि त्या प्रवृत्तींवर नियंत्रण ठेवू पाहाणाऱ्या सांस्कृतिक शिकवणूकी यातील संघर्ष वाढत आहे. हा संघर्ष कमी होण्याऐवजी सतत वाढतच जाणार आहे. कारण संस्कृतीमध्ये भर याचा अर्थ माणसाच्या नैसर्गिक प्रवृत्तींचे दमन असा असतो. मनुष्य सुसंस्कृत होतो म्हणजेच स्वत:च्या नैसर्गिक प्रवृत्ती तो विवेकाने दडपून ठेवू लागतो. मानवाच्या ठिकाणी ज्या विवक्षित सवयी किंवा जी विवक्षित वर्तने आज आपण पाहातो ती त्या त्या काळच्या विवक्षित सामाजिक व नैसर्गिक गरजेपोटी तेथे तयार झाली आहेत. तत्कालिन भौतिक व इतर परिस्थितीने तेव्हाच्या माणसाला काही





विवक्षित प्रश्न टाकला होता व तो प्रश्न सोडवताना माणसाच्या ठिकाणी ते तेवर्तन तयार झाले होते. पण कोठलिही परिस्थिती निरंतर कायम राहात नाही. केव्हातरी ती बदलते आणि बदललेल्या परिस्थितीत जुन्या प्रतिक्रया उपयोगी पडत नाहीत. पण या प्रतिक्रिया एव्हाना इतक्या काही अंगवळणी पडून राहिलेल्या असतात की त्या म्हणजे माणसाची दुसरी स्वाभाविक प्रकृतीच असतात. एक प्रकारची शरिरांतर्गत यंत्रणा. त्यामुळे त्या यंत्रणेची प्रत्यक्ष उपयुक्तता जरी संपुष्टात आली असली तरी तेवढ्यामुळे ती यंत्रणा लुप्त होत नाही. ती यंत्रणा शरिरात तशीच राहून जाते. शरिरात सुप्तावस्थेत का होईना पण ती यंत्रणा कार्यक्षम राहिल्याने कधी कधी अवचितपणे ती जागृत होऊ शकते. आक्रमकपणा व हिंसकपणाची गरज आज समाजाला पूर्वीइतक्या प्रमाणात नसली तरी ती गरज पूर्वी कधीकाळी माणसाला होती आणि तेव्हाच्या परिस्थितीनुसार या ज्या प्रतिक्रिया आपल्या ठिकाणी तयार झाल्या होत्या व ज्या आजही अवशेषरूपाने आपल्या ठिकाणी आहेत त्या कायमच आहेत. त्या काही त्यांची गरज नाही म्हणून मरून गेलेल्या नाहीत. म्हणून कोठल्याही क्षणी त्या उग्र रूप धारण करू शकतात. त्यांच्यावर नियंत्रण फक्त आपल्या विवेकबुद्धीचे चालू शकते. एवढ्याचसाठी मानवी आयुष्यात आत्मज्ञानाला वरच्या दर्जाचे महत्व आहे. माणसाच्या ठिकाणी क्रूरपणा उपजत आहे हा क्रूरपणा हाताबाहेर जाऊन स्वतःचा व इतरांचा घात त्याच्यामुळे घडून येऊ नये असे वाटत असेल तर आपण सतत सावध राहिले पाहिजे. बौद्धिक सावधपणातच शेवटी माणसाचा तरणोपाय आहे. कारण आपली नैतिक भावना आपणास वाटते तितकी प्रबल नाही. आपल्या नैतिक भावना हा आपला दुसरा स्वभाव नव्हे. अद्यापही सामाजिक व खाजगी नीति इतकी आपल्या अंगवळणी पडलेली नाही की निर्धास्तपणे तिच्यावर आपण विश्वास ठेवावा. म्हणून स्वतःच्याच नैतिक बळाविषयी स्वतःच जर आपण साशंक राहिलो तर तेवढेच आपण स्वतःच्या वर्तनाची अधिक काळजी घेऊ. स्वतःच्याच नैतिक बळाविषयी साशंकता म्हणजेच स्वतःच्या नैतिक जबाबदारीविषयी अधिक सावध होय. माणसाने ध्यानात ठेवावे ते हे की आपला चांगुलपणा हा आपला नैसर्गिक स्वभाव नाही. चांगुलपणा स्वतःचा आणि इतरांचाही कधीही कोणी गृहित धरता नये. तसे केल्यास आपण बेसावध बनतो आणि बेसावध क्षणी हातून चूक घडू देतो. जगताना कोणाचेही पाऊल घसरू शकते. नीती ही काही स्वाभाविक गोष्ट नव्हे. तो अंगभूत स्वभाव नसतो. अनेक वर्षांच्या प्रयत्नाने समाजात नीती हळूहळू उत्क्रमित झाली आहे. म्हणजेच नीती ही पर्यायी व्यवस्था आहे. स्वतःच्या सोयीसाठी समाजाने मागाहून ती उत्क्रमित केली आहे. खऱ्या अर्थाने ती अद्याप दृढ व्हायची आहे. मानवी मूळ कार्यप्रेरणा व सहजप्रवृत्ती जेथून कार्यशक्ती मिळवितात तेथूनच नैतिक धारणा स्वतःला लागणारी कार्यशक्ती मिळवितात.

विवेकाच्या मदतीने स्वतःच्या मनोविकाराना आपण काबूत राखित असतो. मनोविकारांबरोबर लढण्याचे तेच आपले एकमेव हत्यार आहे. आता गंमत अशी की काही लोक भावनिक वैचारिक दृष्टचा मूलत.च इतके प्रौढ ( Mature ) असतात की स्वतःवर ताबा चालविणे त्याना फारसे कठीण जात नाही. कदाचित त्यांचे मनोविकार व मूलप्रवृत्ती फारशा प्रबल नसतील. कदाचित बालपणापासून जो आंतरिक शिस्त त्यानी आत्मसात केली असेल तिनेही त्याना ते प्रौढत्व मिळवून दिले असेल. पण हे लोक कोठल्याही परिस्थितीतु मनोविकारांच्या आहारी जात नाहीत. याच्या उलट समाजात असे खूप लोक असतात की जे भावनिक व मानसिकदृष्टचा अप्रगल्भ राहिल्याने ज्याना स्वतःचे मनोविकार काबूत ठेवता येत नाहीत. मनोविकार काबूत ठेवण्यासाठी त्याना भारीच प्रयास पडतात. काहीजण तर साध्यासुध्या घटनानीही प्रक्षुब्ध बनतात आणि समाजविघातक हिंसक कृत्ये करून मोकळे होतात.

विसाव्या शतकात समाजाच्या सुजाण वर्तनाच्या व्यक्तिकडच्या अपेक्षा प्रमाणाबाहेर वाढल्या आहेत. ठायी ठायी व्यक्तिला स्वतःचे मन मारून चेहरा हासरा ठेवावा लागतो. दैनंदिन जीवनात अनेक प्रकारच्या बाह्य व्यत्ययाना व अकारण विलंबास डोके थंड ठेवून तोंड द्यावे लागते. थोडक्यात व्यक्तिजीवनातला तणाव अनेक पटीनी आज वाढला आहे व समाजाशी जमवून घेताना हरएक व्यक्तिला फारच जड जात आहे. परिणामतः समाजातील मनोरुग्णांची, नसविकृतांची ( न्यूरॉटिक लोकांची ) संख्या दिवसेंदिवस वाढत चालली आहे. जुन्या मानसचिकित्साशास्त्रात नसविकृतीची जी व्याख्या करण्यात येत असे तिची या वेळी आठवण येते. जुन्या मानसचिकित्साशास्त्रात नसविकृतांचे दोन वर्ग करण्यात येत. एका वर्गात सामाजिक संकेताशी जमवून घेता न येणाऱ्यांचा पण जे फक्त मनात्या आत पिचत राहात त्यांचा अंतर्भाव होता तर दुसऱ्यात असे जमवून घेता न आल्याने जे प्रक्षुब्ध बनून समाजविघातक कृत्यास प्रवृत होत त्यांचा अंतर्भाव होता. एक प्रकारचे नसविकृत स्वतःचा प्रश्न न सोडविता आल्याने नसविकृत बनत होते. मात्र आपल्या दुःखासाठी ते समाजावर सूड घेण्यात आनंद मानीत नव्हते. किंवा असा सूड घेऊन स्वतःच्या मनावरचे दडपण कमी करीत नव्हते. तर दुसरे असा सूड घेऊन ते दडपण कमी करू पाहात होते. म्हणजे सामाजिक संकेत पाळता येत नसल्याने. समाजाच्या गरजांशी समरस होता न आल्याने मनावरचा ताण वाढून मानसिक आजार निर्माण होतात हे मूलभूत तत्व तेव्हाच्या मानसचिकित्सकानी शोधून काढले होते. माणसे समाजाच्या गरजा व आशा-आकांक्षांशी समरस होत नाहीत कारण त्यांच्या आंगिक प्रेरणा त्याना त्यापेक्षा वेगळया दिशाना घेऊन जाऊ पाहातात. अशा वेळी समाजाच्या गरजा व अपेक्षा आणि व्यक्तिची मानसिक ओढ यात संघर्ष येतो. मग कधी व्यक्ती संपूर्णपणे

समाजालाच शरण जाते व आतल्या आत पिचत जीवन जगते . तर कधी अशा प्रकारे आतल्या आत न पिचता प्रक्षुब्ध बनून समाजाशी विरोध करते महत्वाचा मुद्दा हा की माणसे मानसिक आजारी बनतात कारण वांशिक उत्क्रांती-क्रमात व वंशेतिहासात उत्क्रमित झालेल्या त्यांच्या अंगच्या प्रवृत्ती व संस्कृतीक्रमात निर्माण झालेले संकेत व नैतिक आदर्श याच्यात एकरूपता नसते व ती एकरूपता नसल्याने व्यक्ती मोडतात. मग कधी काही व्यक्ती स्वतःला जाळून घेतात तर काही समाजालाच जाळायला प्रवृत्त होतात. कधी व्यक्ती स्वतःच दुखावल्या जातात तर कधी समाजाला दुखावू पाहातात. नैसर्गिक मानवाला सामाजिक व सांस्कृतिक संकेतांशी जुळवून घेण्यात अपयश आले की नैसर्गिक मानव मनाने आजारी बनतो ही व्याख्या विचारात घेतल्यास तुम्ही आम्ही सर्वचजण या ना त्या प्रमाणात मनाचे आजारी ठरू. कारण आपणापैकी प्रत्येकजणच समाजासाठी, कधी समाजाच्या भीतीपोटी तर कधी समाजाच्या मायेपोटी स्वतःच्या नैसर्गिक प्रवृत्ती दाबून ठेवीत असतो.

अर्थात मानसिक ताण हा कधीही एकाच प्रकारचा असत नाही. मानसिक ताण अनेक प्रकारचे आहेत. आणि या ताणाखाली आपली नैतिक शक्ती सतत पिचत राहाते. भय चिंता व अनामिक धास्ती, उपास, भूक, सतत कठीण निर्णय घ्यावे लागणे, अतिश्रम व त्यातून साचत जाणारा मानसिक थकवा, जीवनाची स्वाभाविक निरर्थकता इत्यादी अनेक प्रकारच्या कारणानी सतत आपल्या मनावर दडपण पडत असते. या दडपणामुळे आपल्या नैतिकशक्तीचा ऱ्हास होत जातो. कधी कधी हे दडपण मग असह्य होते आणि स्वतःच्याच नकळत आपल्यातल्या उग्रपणाचा स्फोट होतो. हे एवढे लांबलचक प्रवचन देण्याचे कारण एवढेच की आपण ज्या विवेकशक्तीवर विसंबून राहू पाहातो. त्या विवेकशक्तीची एकूण ताकद अत्यंत मर्यादित असल्याने नैसर्गिक प्रेरणांच्या आहारी आपण केव्हा जाऊ हेच आपणाला सांगता येणार नाही. हे आपल्या ध्यानात आणून द्यावे. माणूस विचार करून वागतो हे खरे. माणूस सामाजिक संकेताना म्हणजेच जे सामाजिक संकेत त्याने बालपणापासून त्याच्या वडिलधाऱ्यांकडून आत्मसात केलेले असतात त्यांच्याप्रमाणे वागतो ही गोष्ट खरी असली तरी अनेक नैसर्गिक प्रवृत्ती या जशा त्याच्या स्वभावाच्या अविभाज्य भाग बनल्या आहेत तसे हे संकेत बनलेले नाहीत. शेवटी हा सगळा प्रश्न माणसाच्या मानसिक परिपक्वतेचा आहे, वयाची पहिली बरीच वर्षे माणूस त्याची आई, त्याचे वडील, इतर नातेवाईक यांच्यावर अवलंबून असतो. जसजसा तो प्रौढ बनत जातो तसतसा यातील एकएक आधार तो टाकून देतो. स्वतः स्वयंपूर्ण बनतो. परंतु फारच थोडी माणसे खऱ्या अर्थाने स्वायत्त म्हणजे केवळ स्वतःच्या आधाराने जगाला तोंड देऊ शकतील अशी मानसिक भावनिक प्रौढ असतात. या ना त्या प्रमाणात ती भवतालच्या प्रत्यक्ष

माणसांवर वा त्यांच्या प्रतिकात्मक पर्यायांवर अवलंबून असतात. या प्रतिकात्मक पर्याय'चा आधार घेऊन आपण जगात उभे राहाण्याचा प्रयत्न चालविलेला असतो. पण माणूस कितीही धैर्यशाली असला तरी केव्हा ना केव्हा त्याचे हे नैतिक धैर्य डळमळित होते. जगातला एक अत्यंत धैर्यशाली महापुरुष जीवनाच्या शेवटच्या क्षणी " माझ्यादेवा, माझ्या देवा, तू मला का बरे सोडलेस रे " असे म्हणाल्याचे इतिहास सांगतो. आयुष्यातल्या कसोटीच्या क्षणी धैर्याचे महामेरूसुद्धा जर असे दुबळ होऊ शकतात तर तुम्हाआम्हा सामान्य जनांचा या जगात पाड तो काय लागणार? म्हणून स्वतःच्या सद्गुणांबद्दल अवास्तव आत्मविश्वास न बाळगणे हेच अधःपतनापासून स्वतःला वाचविण्याचे एक प्रबल हत्यार आहे असे. मानून तशा प्रकारचे आयुष्य आखू पाहाणे ही गोष्ट सर्वात उत्तम होय.

---

काही कृती आपल्या दृष्टीने चांगल्या असतात आणि काही वाईट असतात. परंतु कृतींचा चांगलेपणा अथवा वाईटपणा ठरविताना आपण त्यांच्यामागच्या हेतूंचा विचार करीत नाही. आपण त्यांचे फक्त सार्वजनिक परिणाम विचारात घेतो. हे परिणाम चांगले असतात त्या कृतीना चांगल्या कृती म्हणतो. उलट ज्यांचे परिणाम सार्वजनिकदृष्टया वाईट असतात त्याना वाईट म्हणतो. मात्र परिणाम विचारात घेऊन आपण या कृतीना चांगले-वाईट ठरविले होते; त्या कृती म्हणून कृती असा विचार करता त्या चांगल्या अथवा वाईट या दोहों-पैकी काहीही नव्हत्या ही मूलभूत वस्तुस्थिती आपण कालांतराने विसरून गेलेलो असतो. दगडाला आपण भक्कम दगड असे म्हणतो. झाडाला हिरवेगार झाड असे म्हणतो. हे आपण भाषा-शास्त्राच्या आणि तर्कशास्त्राच्या घाटणीप्रमाणे करतो. दगड भक्कम आमच्यासाठी असतात. झाडे हिरवी-गार आमच्याकरिता असतात. दगडासाठी दगड भक्कम नसतो आणि झाडदेखिल हिरवेगार नसते. आम्हाला ती तशी असतात. तशी वाटतात. पण भाषेची घाटणी दगड घट्ट आहे, झाड हिरवेगार आहे असे सांगते. आणि याच न्यायाने ज्यांचे परिणाम चांगले त्या कृती स्वतःहून चांगल्या होतात. वाईट परिणामांच्या कृती स्वतःसाठी वाईट होतात.

— फ्रेडरिख नित्शे

* * *





# राज्यशास्त्र व इतिहासमिमांसा

## भारतीय कॉंग्रेस : एकपक्षीय लोकसत्ता ( ६ )

● प्रा. श्री. प्र. सोहनी

पंतप्रधान गटाच्या हालचालींना तोडीस तोड म्हणून, राबातचा धक्का आणि जगजीवनराम यांचा करवुडवेपणा यावर वर्किंग कमिटीत चर्चा करण्याचा सिंडिकेट गटाने विचार ठरविला. त्यांची मजल तेथपर्यंत पोचू शकली. अशा चर्चेमुळे पंतप्रधान गटाला बचावाचे धोरण स्वीकारावे लागून अध्यक्षांना काढून टाकण्याची मागणी मागे पडेल अशी त्यांची भोळी समजूत होती. निजलिंगप्पांनी मात्र आपल्याविरुद्ध चाललेला प्रचार गोबेल्सलाही मागे टाकील, व गोबेल्स परत आला तर त्यालाही नवे धडे शिकता येतील अशा पद्धतीचा असल्याचे सांगितले; ज्या कॉंग्रेसला आपला इतिहास व महान व्यक्तींचा विसर पडला त्या कॉंग्रेसची स्थिती समाधानकारक नसल्याचे सांगून आपण सर्वजण पक्षाचे विभाजन करून तो कसा कमकुवत करता येईल हे पहात आहोत असे ते म्हणाले. कॉंग्रेसमधील संघर्ष ग्रामपंचायतीतल्या निवडणुकांसारखा झाला आहे, कदाचित तेथे देखील असे प्रकार घडत नसतील असे विषादपूर्ण उद्‌गार त्यांनी काढले.

या टीकेला उत्तर म्हणून पंतप्रधानानी कॉंग्रेस फक्त नांवाला उरली असून पुढेमागे तिचे नांवही राहणार नाही अशी भीती व्यक्त केली. मुंबईच्या एका सभेत बोलताना, एक चैतन्यमयी संघटना म्हणून कॉंग्रेस कायम राखणे हे आपले प्रधान कार्य होते व आपण पंतप्रधान राहू वा न राहू याचा विचार न करता आपण ते कार्य करीत राहणार असा विश्वास त्यांनी प्रकट केला.

त्याच सभेत पुढे बोलताना, कॉंग्रेसच्या ऱ्हासामुळे त्यांचे पिताजी असेच व्यथित झाले असताना, त्यांनी पंतप्रधानपद सोडून संघटनेच्या कार्याला वाहून घेण्याचा विचार केला होता, त्यांची ती कल्पना त्यावेळी आपल्याला पटली नव्हती, पण आता मात्र, त्यावेळी तसे झाले असते तर बरे झाले असते असे आपल्याला वाटू लागले आहे; आपला ध्येयवाद आणि आपली धोरणे आपल्या कार्यक्रमात प्रतिबिंबित व्हावयास पाहिजेत. समाजवाद ही एक निव्वळ घोषणा नव्हती वा जादूची कांडीही नव्हती, तो एक ध्येयनिष्ठ जीवनमार्ग होता असे सांगून, आपल्याला जे जे राष्ट्रहिताचे वाटेल ते ते मी करीन असे त्यांनी ठासून सांगितले. ऐक्य, विचार व कृती या दोन्हीत पाहिजे असे सांगून खरे ऐक्य तुकडे जोडून होत नाही, मी

बरोबर, तूं चूक अशा दृष्टिकोणाने ऐक्य साधत नाही असे त्यांनी सांगितले. पक्ष सोडून गेलेल्यांना पक्षात घेताना, तसेच खोटे सभासद करून घेताना पक्षाची शिस्त कोठे असते असा प्रश्नही त्यांनी विचारला. जनता या गोष्टींकडे काणाडोळा करणार नाही असेही बजावले.

दुसऱ्या एका सभेत, प्रगतीचा वेग खुंटविणारे ऐक्य साधून काही उपयोग नाही तर समाजवादी कार्यक्रम अंमलात येण्यासाठी वेगाने प्रगती होईल असे ऐक्य प्रस्थापित व्हायवयास पाहिजे असे त्या म्हणाल्या. तसाच प्रसंग आला तर सर्वस्वाचा त्याग करून समाजवादाच्या मार्गाने आपण एकट्याच जाऊ असे जाहीर करून त्यांनी जनतेच्या मनावर पकड घेतली. त्यांनी थोडा पूर्वेतिहास देखील सांगितला, तीन वर्षांपूर्वी पक्षाचा कार्यक्रम अंमलात आणण्याच्या वेळी काही सहकाऱ्यांनी त्यांच्या पाठीमागे त्यांची निंदा करण्याचा प्रयत्न केला होता व त्यांच्या मार्गात अडथळे आणण्याचा प्रयत्न केला होता त्यावेळी त्यांनी राजिनामा देऊ केला होता. पण आता जरी एकाकी जावे लागले वा सर्वस्व गेले तरी त्या राजिनामा देणार नव्हत्या, तर देशाची व जनतेची सेवा करीत राहणार होत्या. राष्ट्रीयकरणामुळे उत्पन्न झालेल्या चैतन्यामुळे आपण पुढेच जात होतो अशी त्यांची खात्री पटली होती. पंतप्रधान होणे ही त्यांच्या दृष्टीने तितकीशी मोठी गोष्ट नव्हती पण जनतेची सेवा करावयास मिळणे हा एक विशेषाधिकार होता. समाजात बदल घडून येत असताना एकाद्या वर्गावर त्याचा परिणाम होणे स्वाभाविक होते, पण बदल घडू न देणे कोणालाच शक्य नसते व तो अपरिहार्य असतो असे त्यांना वाटत होते. केंद्रात कॉंग्रेसचे स्थान बळकट होते, शासन स्थानभ्रष्ट होण्याचा प्रश्न नव्हता व म्हणून केंद्रात राष्ट्रीय सरकार वा संयुक्त सरकार स्थापन करण्याचा प्रश्न उद्‌भवत नव्हता.

पंतप्रधानगटाला राज्यातून पाठिंबा मिळत असल्यामुळे त्यांना तडजोड नको होती. ७०९ पैकी ४५० सह्या मिळवून डिसेंबरच्या आत नव्या अध्यक्षांची निवड करावयाची त्यांची इच्छा होती. जे काही चालले होते त्याचा चंद्रभानू गुप्तांनी उघडपणे निषेध केला. दहाकलमी कार्यक्रम अंमलात आला नाही म्हणून कॉंग्रेसच्या पदाधिकाऱ्यांना दोषी ठरविणे हा सर्व प्रकार गटबाजीमुळे झाला होता असे स्पष्ट मत व्यक्त करून त्यामध्ये अध्यक्षांनी कोणते अडथळे आणले होते असा त्यांनी सवाल केला. कॉंग्रेसमधील भयानक गटबाजी व भरकटत जाणे संघटनेला विघातक ठरणार होत्या पण त्याबरोबर राष्ट्रातील स्थैर्य नाहीसे होणार होते. धोरण आणि कार्यक्रम याबाबत सहमत असणाऱ्या निष्ठावान नेत्यांच्या संघर्षात संधिसाधू व फायदा करून घेणारे, सत्तेच्या स्थानाभोवती गोळा होणारे स्वतःच्या तुंबड्या भरणार होते अशी त्यांनी टीका केली.





म्हैसूरच्या प्रदेश काँग्रेस कमिटीने सिंडिकेटची बाजू घेतली होती. तेथील मुख्य मंत्री वीरेंद्र पाटील यांनीही ऐक्याचा प्रयत्न केला पण तो अयशस्वी ठरला. त्यांना निजलिंगप्पानी पाठविले असावे असा अनेकांचा कयास होता.

पंतप्रधानगटाला सिंडिकेटला पूर्णतया नामोहरम करावयाचे होते. २७ ऑक्टोबरला इंदिरा गांधीनी आपल्या कनिष्ठ सहकाऱ्याना आपल्या धोरणाची कल्पना दिली. समाजवादी धोरणे आणि कार्यक्रम अंमलात आणण्यासाठी कॉंग्रेस पक्ष बलवान करून त्यात परत चैतन्य निर्माण करणे आवश्यक होते. पक्षाच्या कार्यपद्धतीबाबत त्या असमाधानी होत्या. बैठकीची मागणी एकाद्या व्यक्ती वा व्यक्तींविरुद्ध नव्हती. पक्षाचे धोरण व कार्यक्रम यांचा फज्जा झाला होता तो थांबविणे व गोंधळ थांबविणे हे त्याचे मुख्य उद्दिष्ट होते. कॉंग्रेसमध्ये वाढलेल्या श्रेष्टीशाहीवर त्यांनी टीका केली आणि पक्ष रहावयास पाहिजे असेल तर ती बंद झाली पाहिजे. कारण आतापर्यंत तिच्यामुळे फक्त नेत्यांचाच फायदा झाला असे सांगितले.

दोन्ही गटांच्या बैठकी, पाटील इत्यादी ऐक्यासाठी प्रयत्न करणाऱ्यांच्या नेत्यांशी भेटी सुरूच राहिल्या. त्याच त्याच तक्रारी पुढे आणल्या गेल्या पण तडजोड होण्याची शक्यता दिसेना.

संघर्ष होणार असे निश्चित ठरल्याबर संजीवय्यांनी ज्येष्ठ नेत्यांची इच्छा असल्यास संघटनेची जबाबदारी स्वीकारण्याची तयारी दर्शविली. सह्यांच्या मोहिमेविषयी बोलताना, देशहिताच्या दृष्टीने शासन व संघटना यातील संयोजनाची आवश्यकता प्रतिपादन करून, कॉंग्रेस अध्यक्ष व पंतप्रधान यांचा ध्येयवाद निराळा असला तर संयोजन शक्य नसल्याचे त्यानी प्रतिपादन केले.

याचवेळी सरहद्द गांधी बादशहाखान यांचा दौरा सुरू होता. निजलिंगप्पांनी आपण सर्व काही त्यांच्यावर सोपविणार आहोत, त्यांनी दिलेल्या सल्ल्याबरहुकूम वागणार आहोत असे सांगितले. संजीवय्यांच्या अध्यक्षपदाविषयीं, " मला त्यात काहीच वावगे दिसत नाही, त्यावरून त्यांची संघटनेची सेवा करण्याची इच्छा दिसून येते " एवढेच उद्गार काढले. मात्र नवीन अध्यक्ष निवडण्यासाठी जे सह्या करणे सुरू होते त्याचा " कॉंग्रेस सभासदांवर दडपण आणणे, प्रभाव पाडणे व त्यांना भ्रष्टाचारी बनविणे " असा अर्थ घेतला.

तडजोडीची आशा मावळल्याबर सिंडिकेट गटाचा प्रतिहल्ला जोरात सुरू झाला. मुंबईला पाटील यांनी पंतप्रधानगट सह्या मिळविण्यासाठी सत्ता, जागा आणि पैसा यांचा मुक्त हस्ताने उपयोग करीत आहे व मन वळवून, बाजू पटवून सह्या घेण्याऐवजी त्या लालूच दाखवून वा धमकी देऊन ही घेतल्या जात आहेत असा उघड आरोप केला. त्याचवेळी " संपत्ती निर्माण करून ती वांटण्याऐवजी वा तसा विचार करण्याऐवजी प्रंतप्रधानांना संपत्ती नुसतीच

बांटावयाची आहे असे वाटते, काँग्रेसच्या स्वीकृत आर्थिक धोरणाला विरोधक काँग्रेसमध्येच आहेत असे त्यांना का वाटते ते आपल्याला कळत नाही. त्यांचे विचार दहा कलमी कार्यक्रमापेक्षा फारसे निराळे नाहीत, सह्यांची मोहीम सर्व सत्ता पंतप्रधानांच्या हाती केंद्रित करण्यासाठी असेल, त्यांना हुकुमशहा बनवून, संघटना त्यांच्या हातातील खेळणे बनविण्यासाठी असेल तर मग सर्व प्रश्नाचे स्वरूपच बदलून जाईल, कारण मग संघटना आणि लोकशाही यांची इतिश्रीच होईल. पण अजूनही अध्यक्ष आणि पंतप्रधान यांची भेट झाल्यास त्यांना त्यांच्या एकमनाची व्याप्ती त्यांच्या मतभेदांपेक्षा मोठी आहे असे आढळून येईल " असे विचार त्यांनी मांडले.

वीरेंद्र पाटील यांनी वार्ताहरांशी बोलताना केलेली विधाने बोलकी होती. अध्यक्ष आणि पंतप्रधान या दोघानाही, गैरसमज काढून टाकून पक्षाच्या आणि देशाच्या हितासाठी ऐक्यभावनेने काम करण्याची आपण विनंती केली होती. पण मतभेदांमुळे ते दूर जात होते, पण त्यांच्यामध्ये परस्परांबाबत अविश्वास व संशय असल्यामुळे, तो दूर केल्यास त्यांना एकत्र आणणे फारसे कठीण नव्हते, असे पाटील यांनी सांगितले. या मगळघाचा अर्थ स्पष्ट होता.

याउलट फकरुद्दिन अली अहमद यांनी अध्यक्षांच्या निवडीचे समर्थन केले व तडजोडीची शक्यता पूर्णतया उडवून लावली. अशा निवडीमुळे पक्षात फूट पडणार नाही, कारण अशी निवड प्रथमच होत होती असा प्रकार नव्हता, पूर्वी गंभीर परिस्थितीत अशी निवड झाली त्यावेळी पक्ष दुभंगला नव्हता, पंतप्रधान निजलिंगप्पांना भेटावयास तयार नव्हत्या असा प्रकार नव्हता, पण त्याबाबत सूचना अध्यक्षांकडून यावयास हवी होती, तसेच अशा भेटीने काही निष्पन्न होईल असे त्यांना वाटत नव्हते इत्यादी गोष्टी त्यांनी स्पष्ट केल्या, पण अध्यक्षांना काढून टाकण्याची कारणे मात्र त्यांना निश्चित अशी सांगता आली नाहीत. पक्ष परिणामकारक व गतिमान करण्यासाठी नेतृत्वात बदल पाहिजे एवढेच ते सांग शकले. संघटनेत काहीच घडत नाही असा सर्वसामान्य सभासदांचा ग्रह झाला आहे असेही ते म्हणाले, पण फक्त अध्यक्ष बदलल्याने चैतन्य येईल का या प्रश्नाला, त्यानंतर वर्किंग कमिटी, पार्लमेंटरी बोर्ड व इतर पातळीवर आपोआपच बदल होतील व त्यामुळे पक्षात नवचैतन्य येईल असे ते म्हणाले.

७०९ पैकी ३५० सभासदांच्या सह्या मिळाल्या होत्या. राजस्थानच्या मुरादियांनी गट बदलला होता. निजलिंगप्पांच्या आणि मोरारजींच्या प्रदीर्घ बैठकीनंतर, आपला पंतप्रधानांना भेटण्याचा विचार नाही, तडजोड झाली तर चांगलेच पण ती होईल असे वाटत नाही असे निजलिंगप्पांनी वार्ताहरांना सांगितले. वर्किंग कमिटीतल्या नियुक्त सभासदांना काढून टाकणार का या

प्रश्नाला, ही सूचना कृती करा असे सुचविणारी आहे असे त्यांनी त्याला उत्तर दिले.

३० ऑक्टोबरला पंतप्रधान पक्षाचा नाश करण्याचा प्रयत्न करीत आहेत अशा अर्थाचे पत्र निर्जलिंगप्पांनी कडक शब्दात पाठविले व शासनाच्या उणिवा आणि अपयश झाकण्यासाठी पक्षसंघटनेचा बळी दिला जात आहे अशी टीका केली. त्याच दिवशी सायंकाळी मोरारजी, कामराज, पाटील व इतर सल्लागारांच्या बैठकीत मागणी अर्जावर सह्या करणाऱ्या वर्किंग कमिटीतील नियुक्त सभासदांस काढून टाकण्याची मागणी करण्यात आली. पण तो मागणीअर्ज आपल्याकडे आला नसल्याने तसे करणे युक्त नाही अशी निजलिंगप्पांनी भूमिका घेतली. कामराज व देसाई, कडक धोरण स्वीकारावे, पक्षातील ऐक्य नाहीसे करणाऱ्यांना मुळीच दया दाखवू नये या मताचे होते. सर्वसामान्य पक्षसदस्यांना कडक धोरण आवडेल अशी त्यांची खात्री होती–मोरारजींच्या बाबतीत तर तो प्रतिष्ठेचा प्रश्न बनला होता. ही बैठक सुरू असतानाच " सिंडिकेटचे नेते पंतप्रधान, जगजीवनराम आणि फकरुद्दिन यांचे काँग्रेसचे प्राथमिक सभासदत्व रद्द करणार आहेत आणि १७ नोव्हेंबरच्या संसदेच्या आधिवेशनापूर्वी काँग्रेस सांसदीय पक्षाला नवा नेता निवडण्यास सांगणार आहेत " अशी बातमी प्रसृत झाली. वार्ताहरांनी निर्जलिंगप्पांना मध्यरात्री उठवून त्याविषयी विचारले असता त्यानी आश्चर्य व्यक्त केले व प्रसृत झालेली बातमी सपशेल खोटी व निराधार असल्याचे सांगितले. तसा विचारही आपल्या मनात आला नसल्याचे सांगून कोणातरी सुपीक डोक्याच्या व्यक्तीकडून ही बातमी मुद्दाम व खोडसाळपणाने पसरविली गेली असली पाहिजे असे मत त्यांनी व्यक्त केले.

निर्जलिंगप्पांनी पंतप्रधानाना पाठविलेल्या पत्रात दहाकलमी कार्यक्रमातील अनेक कलमे अंमलात आणण्यात शासनाला आलेल्या अपयशाचा उल्लेख होता, पंतप्रधानांचे पुरस्कर्ते महत्त्वाच्या जागांवरून काढले जात आहेत या आरोपाचा इन्कार होता, शासनाने केलेल्या व न केलेल्या अनेक गोष्टीमुळे पक्षाला हानी पोचली त्याचा उल्लेख होता व दहाकलमी कार्यक्रम अंमलात आणण्यासाठी केलेल्या उपाययोजनांचा अहवाल मागविला होता.

दिनांक ३० ऑक्टोबरला रात्री अध्यक्षांनी सुब्रह्मण्यम् आणि फकरुद्दिन यांना ते वर्किंग कमिटीचे सभासद नसल्याचे कळविले व त्यामुळे १ नोव्हेंबरच्या वर्किंग कमिटीच्या बैठकीवर पंतप्रधानगटाने बहिष्कार घातला. फूट अटळ झाली. पंतप्रधानांच्या निवासस्थानी त्यांच्या गटाच्या वर्किंग कमिटीच्या सदस्यांची सभा घेण्याचे ठरले. रामसुभगसिंग धरून २१ पैकी ११ सदस्य आपल्या गटाचे आहेत असा त्या गटाचा दावा होता. पण रामसुभगसिंगानी आपण घटनात्मक वर्किंग कमिटीला हजर रहाणार असल्याचे कळविले. पंतप्रधान गटात पंतप्रधान,

जगजीवनराम, चव्हाण, फकरुद्दिन, सुब्रह्मण्यम्, बसंतराव नाईक, मोहनलाल सुखाडिया, ब्रह्मानंद रेड्डी, एस्. डी. शर्मा व उमाशंकर दिक्षीत हे दहा सभासद होते.

ज्या बैठकीत निजलिंगप्पांना सभासद काढून टाकण्याचा निर्णय घेण्यात आला त्या बैठकीला मोरारजी, पाटील, घोष, के. आब्राहाम व सादिक अली हजर होते. कडक धोरण न स्वीकारल्यास पक्षाचे नियंत्रण अगदी सहजरीत्या इंदिरा गांधींच्या हाती जाईल असा इशारा बैठकीत दिला गेला. फकरूद्दिननी अध्यक्षांचा विश्वास गमावला, अध्यक्षावर टीका केली, पक्षविरोधी भूमिका घेतली, सह्या गोळा करण्यात भाग घेतला व अक्षम्य अशी फसवणूक केली म्हणून त्यांचे सभासदत्व रद्द करण्यात आले होते. या सभेच्या वेळीच पंतप्रधान, चव्हाण, जगजीवनराम, स्वर्णसिंग, फकरूद्दिन, द्वारकाप्रसाद मिश्र, दिनेश सिंग, सुब्रह्मण्यम् आणि दिक्षीत यांची बैठक होऊन अध्यक्षांकडून आलेल्या पत्राचे उत्तर तयार करण्यांत आले. सुखाडिया ऐक्याचा प्रयत्न करीतच राहिले पण त्याचा कांही उपयोग होणार नव्हता.

## वर्किंग कमिटीची बैठक :

१ नोव्हेंबरच्या वर्किंग कमिटीच्या बैठकीला सिंडिकेट गटाचे ११ सभासद उपस्थित होते. बैठकीत दोन तासांच्या चर्चेनंतर खास अधिवेशनाची मागणी अमान्य करण्यात आली. पंतप्रधानगटाने आपले बहुमत आहे हे दाखविण्यासाठी अ. भा. कॉ. कमिटीचे खास अधिवेशन २२ आणि २३ नोव्हेंबरला दिल्लीला घेण्याचे ठरविले. या निर्णयाचा अर्थ कांग्रेसची छकले झाली असाच होता.

वर्किंग कमिटीने मागणीअर्जावरील ४०५ सह्यापैकी १०० सह्याबाबत संशय व्यक्त केला होता. मागणीअर्ज बहुगुणा यांनी चिटणीस सादिक अली यांजकडे दिला होता. तो अर्ज अध्यक्षांवर अविश्वास दाखविणारा असल्यामुळे स्वीकारला गेला नाही असे सादिक अलींनी जाहीर केले. डिसेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात गुजरातमध्ये अ. भा. कॉं. कमिटीचे अधिवेशन भरेल असेही जाहीर केले. आब्राहाम दोन्ही सभाना हजर होते पण त्यांनी आपण पूर्वीच्या कॉंग्रेसकडे असल्याचे सांगितल्यावरून निजलिंगप्पा गट ११ व पंतप्रधान गट १० अशी विभागणी झाली.

पंतप्रधान गटाच्या बैठकीत रोडावलेल्या वर्किंग कमिटीला निर्णय घेण्याचा अधिकार नाही असा आक्षेप घेण्यात आला. त्यानंतर पंतप्रधान, त्यांचे सहकारी व काही मुख्यमंत्री यांच्या दोन प्रदीर्घ बैठकी झाल्या व एक ठराव संमत करण्यात आला. वर्किंग कमिटीने मागणी अर्ज फेटाळला ही गोष्ट अवैध ठरविण्यात आली—घटनेने पक्षाच्या सभासदांना दिलेल्या लोकशाही हक्कांविरुद्ध असे फेटाळणे असल्याचे नमूद करण्यात आले, व म्हणून २२ आणि २३ नोव्हेंबरला अ. भा. कॉं. कमिटीचे अधिवेशन घेण्याचे ठरवून त्यासाठी फकरुद्दिन, सुब्रह्मण्यम् आणि शर्मा यांची कमिटी नेमण्यात आली. दुसऱ्यात एका ठरावाने अध्यक्षांनी फकरुद्दिन

व सुब्रह्मण्यम् यांच्याविरुद्धचे आदेश परत घ्यावेत असे त्याना कळविण्यात आले. या ठरावाची प्रतिक्रिया एवढीच झाली की अध्यक्षांनी शर्मांनाच काढून टाकण्याचा आदेश दिला. १४० सभासदानी मागणी केल्यास अधिवेशन बोलवावे असा नियम असताना तो अमान्य करून अध्यक्ष लोकशाही पद्धतीचा अवमान करीत होते त्याविरुद्ध आपले हक्क प्रस्थापित करणे हा बहुसंख्य सभासदांचा अधिकार आणि कर्तव्य असल्यामुळे खास अधिवेशनांचा निर्णय घ्यावा लागला असे सुब्रह्मण्यम यांनी निवेदन केले ०

आपल्या निवासस्थानी भरलेल्या सभेत पंतप्रधानानी बंगलोरपासूनच्या घटनांचा आढावा घेतला. त्यांना अध्यक्षांविरुद्ध वैयक्तिक काहीच म्हणावयाचे नव्हते. फक्त ते कामराज आणि पाटील यांच्या नादाने वागतात अशी त्यांची तक्रार होती. पक्षात दुफळी होईल असे त्यांना वाटत नव्हते. समाजवादी कार्यक्रम मान्य नसेल त्यांनी पक्ष सोडावा अशी त्यांची सूचना होती.

निजलिंगप्पा गटाला स्वसामर्थ्याची खात्री नसल्यामुळे तो गट अधिवेशन नको म्हणत असावा असा अनेकांचा ग्रह झाला होता. बहुमत होण्यासाठी दोन सभासदाना वर्किंग कमिटीतून काढून टाकले असा त्या गटावर पंतप्रधान गटाचा आरोप होता. अहमद यांना काढून टाकण्याची जी कारणे दाखविली होती ती इतरांच्या बाबतीतही असल्याने एकट्या अहमद यांना काढून टाकणे बरोबर नव्हते असा आक्षेप होता. शर्मांची गोष्ट वेगळी होती. शर्मांनी अध्यक्षांचा विश्वास गमावल्यामुळे त्यांना काढून टाकले होते. शर्मा मूळ सिंडिकेटच्या बाजूचे होते, अतुल्य घोषांच्या शिफारशीने त्यांची नेमणूक झाली होती, या शर्मांनी चिटणीस या नात्याने सुब्रह्मण्यम् यांना काढून टाकण्याचा सल्ला निजलिंगप्पांना दिला होता व त्या शर्मांनीच सुब्रह्मण्यम् वगैरेविरुद्ध योजण्यात यावयाच्या उपायांची माहिती पंतप्रधानांना पुरविली असा अंदाज होता. त्यामुळे त्यांनी अध्यक्षांचा विश्वास गमावला.

नवा पक्ष स्थापन करावयाचा नाही असे पंतप्रधानांचे धोरण होते. पक्ष फुटू नये म्हणून त्या प्रयत्नशील होत्या, निदान तसे वारंवार सांगत होत्या, पण त्यांचे मुद्दे व त्यांच्या मागण्या मान्य झाल्यासच पक्षातील एकी त्याना पाहिजे होती. कोणाही सिंडिकेट पुढाऱ्याला भेटावयास त्यांची ना नव्हती पण सूचना मात्र त्यांना सिंडिकेटकडूनच यावयास पाहिजे होती. त्या पक्ष वा अध्यक्ष यांविरुद्ध काहीच बोलल्या नव्हत्या—फक्त त्यांनी आपली भूमिका स्पष्ट करणारी पत्रे पाठविली होती. एकी कशी घडवून आणावी याविषयी त्या काहीच बोलत नव्हत्या. सुब्रह्मण्यम् यांनी अध्यक्षांनी आदेश परत घेतल्यास एकी होईल असे सांगितले होते. त्यानंतर राजकीय परिस्थितीचा विचार करून खास अधिवेशनाचा



अनुक्रमणिका

विचार करता येईल अशी त्यांची कल्पना होती. त्यांच्या दृष्टीने महत्वाचा प्रश्न बहुसंख्येचा नसून हक्कांचा होता

तसे वातावरण तंग होते. वर्किंग कमिटीच्या सभास्थानी निदर्शने झाली. सभासदांना त्रास दिला गेला. पोलिसांना सभागृहाच्या प्रवेशद्वाराचे रक्षण करावे लागले. निजलिंगप्पांना धक्काबुक्की झाली त्यात ते एकदा खाली पडले. अध्यक्षांची अशी परिस्थिती यापूर्वी कधीच झाली नव्हती.

दुसऱ्या दिवशी वर्किंग कमिटीची ( सिंडिकेट गट ) बैठक भरून निराळ्या अधिवेशनाच्या निर्णयाचा निषेध करण्यात आला. त्यात जे भाग घेतील त्यांना घटनात्मक परिणामांना तयार रहावे लागेल असा इशारा देण्यात आला. पंतप्रधान व त्यांचा गट यांच्या कृतींमुळे काँग्रेसला मान खाली घालण्याची वेळ आल्याचे नमूद करण्यात आले व अजूनही त्यांनी आपली पाऊले मागे घेऊन पक्षात शिस्त राखण्याचा व ऐक्य साधण्याचा प्रयत्न करावा असे त्यांना सांगण्यात आले

या बैठकीनंतर जरा वेळाने पंतप्रधान गटाची बैठक भरली व त्यांनी ही विनंती मनापासूनची व खरी वाटत नसल्याने ती उडवून लावली. तीन सभासदांविरुद्ध आदेश परत घेतले असते, मागणी अर्जाचा विचार डिसेंबरच्या अ. भा. का. कमिटीत केला जाण्याचे आश्वासन दिले असते तर त्या विनंतीला काहीतरी अर्थ होता. थोडक्यात पंतप्रधान गटाच्या सर्व मागण्या मान्य केल्या असत्या तर ती विनंती मनापासूनची वाटली असती. याचवेळी एका ठरावान्वये अध्यक्षांच्या पक्षात फुटीला जबाबदार धरण्यात आले, तीन सभासदांना वर्किंग कमिटीतून काढून टाकणे अवैध ठरविण्यात आले, तसेच बहुसंख्य सभासदांच्या सह्या असलेला खास अधिवेशनाच्या मागणीचा अर्ज संघटनेच्या दृष्टीने एक गंभीर प्रश्न मानला जावयास हवा होता, अध्यक्षांनी घटनेचा भलता अर्थ लावून त्यामागे लपण्यापेक्षा आपल्याला खरोखरी किती पाठिंबा आहे हे पहावयास पाहिजे होते, ज्यांनी एकी पाहिजे असे सांगत असताना आपल्याच पक्षाच्या परराष्ट्रीय धोरणाची माहितीही न घेता त्यावर आग पाखडली होती हे आश्चर्य वाटण्यासारखे होते असेही पत्रकात नमूद करण्यात आले.

यानंतर सिंडिकेट गटाच्या वर्किंग कमिटीच्या बैठकीत आसामच्या चालिहांनी, फूट झाल्यास केंद्रात व राज्यात अस्थिरता येईल म्हणून तडजोड व्हावी असे आवाहन केले. पण अ. भा. कॉ. कमिटीच्या पदाधिकाऱ्यांशिवाय खास बैठक घेण्याचा इतर कोणालाही अधिकार नाही असे वर्किंग कमिटीने स्पष्ट केले. महाराष्ट्रात शासकीय अधिकाराचा व स्थानाचा पुरेपूर उपयोग केला गेला असा आरोप केला गेला. संघटनेच्या निवडणुकीत ज्यांना भाग घेण्याचा अधिकार नव्हता त्यांनीही मागणी अर्जावर सह्या केल्याचे दाखविण्यात आले. संघटनेने

आणलेल्या अडथळ्यांमुळे समाजवादी कार्यक्रम लांबणीवर पडला असा पंतप्रधान-गटाने आरोप केला होता तो धूळफेक असून जनतेचा रोष शासनाकडून संघटनेकडे वळविण्याची ती एक कल्पना होत. असे सांगण्यात आले. पक्ष संघटनेबाबत सर्व काही करीत असला तरी कार्यक्रम अंमलात आणणे हे सरकारचे कार्य असते असे स्पष्ट करून निव्वळ मोठ्या शब्दात मांडलेले कार्यक्रम व समाजवादाचे पोकळ नारे यांनी जनता फसत नाही असे सांगण्यात आले. शासनात हेतूंची पूर्ती व त्याबाबतची कळकळ याबाबत अनेक उणिवा होत्या म्हणून अंमलबजावणीची जबाबदारी दुसऱ्यावर टाकण्यामुळे जनतेत क्षोभ होईल असा इशारा दिला होता.

फक्त मुस्लीम राष्ट्रांच्या रबात परिषदेला बोलावणे मागून घेण्याचा प्रयत्न अयोग्य होता, त्यामुळे भारतीयांच्या अस्मितेला आणि प्रतिष्ठेला धक्का बसला व राष्ट्रसमूहातील आधीच कमी झालेले वजन अधिक कमी झाले असा ठरावात उल्लेख होता, त्याला पंतप्रधान गटाने जोरदार आक्षेप घेतला. हा ठराव जनसंघी असल्याचा आरोप करून वर्किंग कमिटीने या बाबतीत जनसंघाचा प्रभाव आपल्यावर पडू दिला ही एक दुर्दैवी घटना मानण्यात आली.

त्यानंतर सात मुख्य मंत्र्यांनी तडजोड करण्याचा प्रयत्न केला. तडजोडीच्या अटी सन्मान्य असतील तर तडजोड करण्याचे पंतप्रधानांनी आश्वासन दिले होते. मुख्य मंत्री आणि नेते यांच्या बैठकी सुरू होत्या. २५ ऑगस्टला जी स्थिती होती ती परत प्रस्थापित झाल्यास सिंडिकेटची तडजोडीची तयारी होती. पण तसे होण्यासाठी अध्यक्षांना तीन सभासदांविरुद्धचे आदेश परत घ्यावे लागणार होते, व पंतप्रधान गटाला खास बैठकीची मागणी मागे घ्यावी लागणार होती. चार कनिष्ठ मंत्र्यांना परत घ्यावे लागणार होते. पण ही अट पंतप्रधानगटाला मुळीच मान्य नव्हती. त्या गटाने दोन पर्याय सुचविले होते. निजलिंगप्पांनी पंतप्रधानांच्या सल्ल्याने वर्किंग कमिटी आणि पार्लमेंटरी बोर्ड यांची पुनर्रचना करावी व १९७० च्या शेवटापर्यंत त्यांनी अध्यक्षपदावर रहावे; अथवा तीन सभासदांविरुद्धचे आदेश परत घ्यावे. मागणी केलेले खास अधिवेशन घ्यावे किंवा वर्किंग कमिटीने बोलावलेल्या अधिवेशनात मागणीअर्जाचा विचार करण्यात यावा. या दोन्ही पर्यायात पंतप्रधानगटाने आपली भूमिका मुळीच बदलली नव्हती असे स्पष्ट दिसत होते. सिंडिकेटला यातील कोणताही पर्याय मान्य नव्हता. दोन्ही गट आपापल्या भूमिकांशी दृढ होते. संसदीय पक्षातून फारसे लोक फुटणार नाहीत असे रघुरामय्यांनी आश्वासन दिल्यामुळे पंतप्रधानगटाला पराभवाची धास्ती नव्हती. निजलिंगप्पांच्या पुरस्कर्त्यांना ऐक्य हवे होते पण शरणागतांचे ऐक्य नको होते. अहमद यांनी अध्यक्षांवरच हल्ला केला होता तेव्हा त्यांनी खेद प्रदर्शित केल्याशिवाय त्यांना परत घेतले जाणे शक्य नव्हते.





पण खरा प्रश्न पंतप्रधानाना ऐक्य हवे होते का हा होता, कारण ऐक्य कशासाठी असा प्रश्न त्यांनी विचारला होता.

३ नोव्हेंबरला परत एकदा पत्रांची देवाणघेवाण झाली. पण त्यामध्ये एकत्र येण्यासारखी समान भूमी कोठेच नसल्याने मुख्य मंत्र्यांनी ऐक्याचे प्रयत्न सोडून दिले.

पंतप्रधानाना लिहिलेल्या पत्रात, अ. भा. कॉं. कमिटीचे अधिवेशन भरविल्यास त्याचे फार दूरगामी परिणाम होतील, आपण दिलेले काही आदेश बेकायदेशीर आहेत असे सांगून आपल्याला काढून टाकण्यासाठी खास अधिवेशनाची मागणी करणे ही कृती, पूर्णतया बेशिस्तीची, घटनाभंग करणारी, व संघटनेतील ऐक्य नाहीसे करणारी अक्षम्य कृती होती असे अध्यक्षांनी स्पष्ट लिहिले होते. ते पत्र एक आरोपपत्रच होते. स्वातंत्र्योत्तर काळात पक्षप्रमुखाने इतके कडक पत्र पंतप्रधानाना प्रथमच लिहिले होते. त्यात बेशिस्त आणि गटबाजी याना उत्तेजन देऊन पक्षाचा नाश करण्याचा प्रयत्न केला असा उघड आरोप पंतप्रधानांवर केला होता. पंतप्रधानाना नको असलेल्या मुख्य मंत्र्याना पदच्युत करण्याचा प्रयत्न केल्याचाही आरोप होता. ह्या पत्राला लिहिलेल्या उत्तरात आपल्या मागणीत काहीही वावगें नव्हते, मुदत संपल्यामुळे निजलिंगप्पांच्या जागी दुसरा अध्यक्ष निवडावा ही सभासदांची मागणी अगदी रास्त होती; पुन्हा उभे राहून निवडून येण्यास निजलिंगप्पांना पूर्ण मोकळीक होती; बहुसंख्य सभासदांच्या इच्छेला मान देणे हे अध्यक्षांचे कर्तव्य होते, खास बैठक घेऊन पक्षविरोधी व्यक्ती पक्षांतून काढून टाकणे हे त्यांचे कर्तव्य होते व मागणीपत्र घटनेनुसार होते असे पंतप्रधानानी कळविले.

ह्या पत्रामुळे व मुख्यतः ते तावडतोबीने जाहीर केल्यामुळे पंतप्रधान गटाला फार राग आला. वास्तविक पत्र लिहिल्याबरोबर ते ज्याला पाठवावयाचे त्याला मिळण्याआधी वृत्तपत्रांकडे पाठवावयाची प्रथा पंतप्रधान गटाने सुरू केली होती. ती प्रथा दुसऱ्या गटाने वापरल्यास त्यात रागावण्यासारखे काही नव्हते— पण अध्यक्षानी पत्राचे उत्तर येईपर्यंत ते जाहीर करणार नाही असे कळविले होते, मागाहून मात्र कोणकोणत्या गोष्टी घोक्यात आहेत, ऐक्याला कोणापासून धोका आहे, धोरणे, ध्येयवाद आणि कार्यक्रम कोण बाजूला ठेवीत आहे हे जनतेला कळावे यासाठी पत्र जाहीर करणे भाग पडले असे त्यांनी कळविले. पंतप्रधानांच्या पुरस्कर्त्यांनी पत्र जाहीर करून ऐक्य प्रयत्नांना अध्यक्षांनी सुरुंग लावला असा आरोप केल्यावर, वर्किंग कमिटीने सांगितले म्हणून पत्र जाहीर केल्याचे त्यांनी सांगितले.

पंतप्रधानानी आपल्या उत्तरात अध्यक्षांनी अनेक बेकायदेशीर गोष्टी केल्याचे, पंतप्रधान आणि सरकार यांच्याविरुद्ध निंदाव्यंजक प्रचाराला उत्तेजन दिल्याचे,

राष्ट्रीयकरण, तनखेबंदी व सर्वसाधारण धोरण याविरुद्ध पाटील यांनी भाषणे केल्याचे, अध्यक्षानी स्वतः सार्वजनिक क्षेत्राविरुद्ध भाषण केल्याचे नमूद केले होते. पेचप्रसंग रेड्डींचे नांव संमत झाल्यामुळे निर्माण झाला होता. ज्यांनी मत स्वातंत्र्य मागितले ते कम्युनिस्ट व मुस्लीम लीग बरोबर सहकार्य करतात असा आरोप केल्याबाबत निषेध केला होता. पक्षासाठी जमविलेल्या पैशाबाबत चौकशी करणे आवश्यक होते पण ती निःपक्षपातीपणाने करावयास हवी होती असे मत व्यक्त केले होते. पण पाटील यांनी जमविलेल्या पैशाचे काय झाले असा प्रश्नही विचारला होता.

या पत्राला अध्यक्षानी पाठविलेल्या उत्तरात, पंतप्रधानांची भाषणे व त्यांची कृती यावरून संघटनेच्या भूमिकेविषयी व तिच्या हक्काविषयी पंतप्रधानांच्या कल्पना अवास्तव असाव्यात असे वाटते अशी टीका अध्यक्षानी केली होती. "पक्षाने एकादा उमेदवार निवडला व तो तुम्हाला आवडला नाही, तर त्याच्या-विरुद्ध जावयाला तुम्हाला स्वातंत्र्य आहे असे तुम्हाला वाटते; पक्षाने ध्येय, धोरण अथवा कार्यक्रम स्वीकृत केले, तरी त्यातील तुम्हाला आवडेल तेवढेच स्वीकारून तेच अंमलात आणावयाचे असे तुम्हास वाटते. संघटना अथवा सांसदीय पक्षाची एकादी संस्था शासनाच्या धोरणांची अथवा कृतींची छाननी करावयास लागते तेव्हा तुम्ही अस्वस्थ होता. धोरणे ठरविणे, शासकीय कृतींची छाननी करणे, निवडणुकीसाठी उमेदवार उभे करणे इत्यादी बाबतीत संघटनेचे कार्यक्षेत्र जितके संकोचेल तितके चांगले अशी तुमची भूमिका असल्याचे तुम्ही दर्शविता " असे स्पष्ट मत त्यांत व्यक्त केले होते. कांही जुन्या कांग्रेस नेत्यांनी राष्ट्रीयकरणाला विरोध केला होता याचा त्यानी इन्कार केला- कामराज, घाष इत्यादी सिंडिकेट नेत्यांनी पूर्वी त्याची मागणी केली होती याची त्यांनी आठवण करून दिली. तसेच सामाजिक नियंत्रणे अयशस्वी झाली तर राष्ट्रीयकरणाचा पर्याय पंतप्रधानानी सुचविला होता असेही त्यांनी स्पष्ट केले. " मात्र आता राष्ट्रीयकरण हे तुमच्या बुद्धिमत्तेचे प्रतीक मानले जात आहे व इतर सर्व त्याविरुद्ध असून ते सर्व प्रतिगामी असे दाखविले जात आहे. तुम्ही जे चित्र रंगवीत आहांत ते पुरोगामी शक्तींच्या नेत्या म्हणून तुमची प्रतिमा निर्माण करण्यास उपयुक्त ठरले आहे." असेही त्यांत लिहिले होते.

फकरुद्दिन अली अहमद यांनी आपल्याविरुद्ध घेतलेला निर्णय सूडबुद्धीने घेतल्याचे नमूद करून असा अवैध निर्णय आपण मान्य करणार नसल्याचे, घटनेतील नियमानुसार आपण वर्किंग कमिटीचे सभासद असल्याचे व २५ ऑगस्टला आपण आपल्याजवळ अध्यक्षांवर केलेल्या आरोपांबाबत पुरावा नाही असे मागितले ते फक्त संघटनेतील एकी टिकविण्यासाठी सांगितले असे अध्यक्षांना कळविले. ( श्री. फकरुद्दिन यांच्या एकंदर वागण्यावरून त्यांनी पुरावा असताना तो मागे

ठेवला असता असे वाटत नाही. या सर्व प्रकारानंतरही त्यांनी तो पुरावा पुढे आणला नाही. )

●

मुख्य मंत्र्यांना ऐक्य टिकविण्याचा प्रयत्न केला पण त्यांना यश मिळाले नाही. सुकादिया यांनी अपयशाचे खापर निजलिंगप्पांच्या क्षोभक पत्रांवर फोडले. चामिद्रा व मुकादिया अध्यक्षांना भेटले त्यावेळी अध्यक्ष सुब्रह्मण्यम् यांना कायम निमंत्रित म्हणून वर्किंग कमिटीत घ्यावयास ते तयार होते, पुढे होणाऱ्या अ. भा. कॉं. कमिटीच्या बैठकीत फक्त अध्यक्षांचीच नव्हे तर सर्व संघटनात्मक निवडणुका घेण्याचा प्रस्ताव ठेवावयास तयार होते पण पंतप्रधान गटाला फक्त अध्यक्षांचीच निवडणूक हवी होती. सर्व मुख्यमंत्री जातांना पंतप्रधानांना भेटून गेले पण पक्षांतील फुटीमुळे त्यांना आपली सत्ता डळमळीत होणार असे वाटले ते व्यथित व जड अंतःकरणाने परतले.

क्रमशः —

---

युद्धाच्या विरोधात हे म्हणता येईल की युद्धामुळे युद्धातला विजेता मूढ बनतो आणि हरणारा सूड प्रेरित होतो 

पाहा! पाहा! तो गृहस्थ मनुष्याच्या कळपापासून कसा दूर पळत चालला आहे. पण सगळी मंडळी मात्र त्याच्याच मागून धावत आहेत हे काय? अहो, बरोबर आहे. तो त्यांच्या पुढेच तर पळत आहे. मनुष्य हा कळपात राहाणारा प्राणी आहे. 

कडवी माणसे नेहमीच पाहायला छान दिसतात. जगात शहाणपणाच्या गोष्टीपेक्षा नाटकाला भाव अधिक असतो. सत्याचे सोंग जेवढे खात्री-लायक वाटते तेवढे सत्य वाटत नाही. 

माणसात राहायचे म्हणजे तोंडावर थोडाफार मूर्खपणा धारण करावाच लागतो. तुमचे खरे हेतु काय आहेत हे मला कळले आहे असे जर मी दर्शविले तर एकसुद्धा मनुष्य माझ्या धाऱ्याला उभा राहाणार नाही. 



अनुक्रमणिका

# आभार :

या अंकावरोबर " नवी क्षितिजेला " आठ वर्षे पूर्ण होऊन ' नवी क्षितिज ' नवव्या वर्षात पदार्पण करीत आहे. " विमा मुद्रक व प्रकाशक " या संस्थेचे व्यवस्थापक श्री. दामले व " नागरिक " छापखान्याचे श्री. चावरे यांच्या आपलेपणावाचून व सहकार्याशिवाय हे शक्य झाले नसते. श्री. दामले व श्री. चावरे या दोघानीही आमच्या अनेक त्रुटींकडे काणाडोळा करून छपाई व्यतिरिक्त दुसऱ्यासुद्धा अनेक वावतीत जर सहकार्याचा हात पुढे केला नसता तर " नवी क्षितिजेला " नवव्या वर्षात पदार्पण करता येणे कधीही शक्य झाले नसते एवढेच आम्ही येथे सांगू इच्छितो. तेव्हा श्री. दामले, विमा मुद्रकमधिल इतर मित्र व कामगार वंधू तसेच नागरिक छापखान्याचे श्री. चावरे व त्यांचे सहकारी या सर्वांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोत.

" नवी क्षितिजेच्या " वाचक वर्गणीदारांची एव्हाना जवळ जवळ खात्रीच पटली आहे की हे अंक वेळच्या वेळीं बाहेर पडू शकत नाहीत. तरीसुद्धा त्यानी क्षितिजेवर प्रेम दाखविले. आपण होऊन वर्गणी भरली आणि इतरानाही वर्गणीदार व्हावयास प्रवृत्त केले.

पामार्टचे श्री. भाऊसाहेत परचुरे व श्री. वापूसाहेव मायदेव यानी " नवी क्षितिजेच्या " रचनेची वाजू सांभाळली.

अमेरिकेतील श्री. फ्रँक व सौ. एलनॉर केलेमन ( Frank and Eleanor Kelemen ) व झुरिक येथील वारबरा डच्यूई ( Barbara Duie ) यानी " नवी क्षितिजेसाठी " अनेक ग्रंथ व नियतकालिके भेट म्हणून पाठविली.

श्री. सदानंद वसणकर व श्री. स. ह. मोडक यानी वेळात वेळ काढून क्षितिजेसाठी लिहिले.

महाराष्ट्रातील नामवंत प्रकाशक श्री. रा. ज. देशमुख, तसेच श्री. वालावलकर, श्री. अहमदभाई यानी अन्य प्रकारे सहाय्य केले.

आम्ही या सर्वांचे अत्यंत ऋणी आहोत.

—संपादक

अनुक्रमणिका